# नवभारत

वर्ष ६ वें ] जानेवारी १९५३ [ अंक ४ था



किंमत १ रुपया








नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com





# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सहावें | अंक चौथा

# नवभारत

जानेवारी १९५३

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर

का. संपादक



वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका








# 'नवभारत', जानेवारी १९५३

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचे लेख या वर्षीं मागील अंकांत आले असून, तेथें त्यांचा परिचय दिला आहे —का. सं. ]

**महामहोपाध्याय वा. वि. मिराशी,** ( नागपूर )—नागपूर विद्यापीठांतील सेवानिवृत्त प्राचार्य, प्राच्यविद्यापंडित, पुराणेतिहाससंशोधक, ' कालिदास ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. भा. पं. बहिरट** बी. ए. ( पंढरपूर )—संतवाङ्मयाचे व्यासंगी. ' प्रेमबोध ' या मासिकाचे एक संपादक. पंढरपूर येथील ' संशोधन-मंडळा 'चे अध्यक्ष.

**प्रा. नी. र. वऱ्हाडपाण्डे** एम्. ए. बी. लिट् ( ऑक्स. )—दिल्ली येथें संरक्षणविषयक वैज्ञानिक संघटनेच्या मानसशास्त्रीय संशोधनशाखेमध्यें प्रमुख मानसशास्त्रज्ञ ( Senior Psychologist ). ' कूजन ', ' सुखदुःखविवेक ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. भि. वि. मराठे**—ट्रेड युनिअन चळवळीचे एक कार्यकर्ते. ' रॅडिकल ह्युमॅनिस्ट मूव्हमेंट 'चे एक पुरस्कर्ते. ' Railwaymen's Herald ' चे एक माजी संपादक.

**श्री. श्री. व्यं. नखाते**—पुणें येथील ' लोकशक्ति ' या दैनिकाचे सहसंपादक.

---

* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

भासाच्या नांवावर खपविलेल्या एका बनावट नाटकावर प्रकाश : प्रा. वा. वि. मिराशी

# • • 'यज्ञफल' नाटकाची समस्या

सन १९१२ मध्यें कै. म. म. गणपतिशास्त्री यांनीं महाकवि भास याचीं म्हणून तेरा नाटकें 'त्रिवेंद्रम् संस्कृत ग्रंथमालें'त प्रसिद्ध केलीं. तोंपर्यंत त्या कवीचें नांव कालिदास, राजशेखर इत्यादिकांच्या ग्रंथांतील उल्लेखांवरून व सुभाषितसंग्रहांत त्याच्या नांवावर दिलेल्या श्लोकांवरून माहीत होतें. त्याची एकहि नाट्यकृति उपलब्ध नव्हती. तीं तेरा नाटकें प्रकाशित झाल्यावर त्यांच्या भासकर्तृकत्वाविषयीं पुष्कळ चर्चा झाली. अद्यापि हा प्रश्न वादग्रस्त आहे. तथापि, त्यांपैकीं 'स्वप्नवासवदत्तम्' हें नाटक मात्र भासाच्या तन्नामक नाटकाची किंचित् बदललेली आवृत्ति असावी याविषयीं आतां संशय राहिलेला नाहीं. इतर नाटकांमध्यें त्या नाटकासारखे शब्दप्रयोग, मंगलश्लोक, भरतवाक्य वगैरे दिसत असल्यानें तींहि भासाचीं असावींत असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे.

हीं नाटकें प्रसिद्ध झाल्यानंतर सुमारें तीन वर्षांनीं सौराष्ट्रांतील गोंडल येथील राजवैद्य जीवराम कालिदास शास्त्री यांनीं आपल्या 'रसशाला औषधाश्रम' संस्थेतर्फे 'महाकविश्रीभासप्रणीतं यज्ञफलम्' या नांवानें एक नाटक प्रसिद्ध केलें. त्याला जोडलेल्या उपोद्घातांत राजवैद्यांनीं हें नाटक आपणांस कसें मिळालें याची हकीगत दिली आहे. सन १९२४ च्या सुमारास त्यांना काशी, सुरत, पंजाब इत्यादि ठिकाणांहून हस्तलिखितांचा मोठा संचय मिळाला. त्यांत 'यज्ञफल' नाटकाचीं दोन हस्तलिखितें— एक विक्रमसंवत् १७२७ मध्यें व दुसरें वि. सं. १८५९ मध्यें— देवनागरींत लिहिलेलीं मिळालीं. तीं वाचल्यावर तें नाटक भासाचेंच अशी त्यांची खात्री झाली. तथापि, अनेक कार्यांत व्यापृत असल्यानें त्यांना तें नाटक लागलीच प्रसिद्ध करतां आलें नाहीं. त्यानंतर सतरा वर्षांनीं— सन १९४१ मध्यें—त्यांनीं आपले मित्र अल्मोडानिवासी श्रीगोपालदत्त शास्त्री यांनीं लिहिलेल्या टिप्पणींसह तें नाटक प्रसिद्ध केलें. या उपोद्घाताची तारीख १९-७-१९४१, अशी शेवटीं दिली आहे.[1]

भास हा अत्यंत प्राचीन संस्कृत कवि. कविकुलगुरु कालिदासानेंहि आपल्या 'मालविकाग्निमित्रम्' नाटकांत त्याची 'प्रथितयशस्' म्हणून प्रशंसा केली आहे. अशा महाकवीची नाटककृति उपलब्ध झाल्यावर तिजविषयीं संस्कृतज्ञांना अत्यंत कुतूहल उत्पन्न व्हावें व त्यांनीं तिची सर्वांगीण चर्चा करावी असें कोणासहि वाटेल. पण या नाटकाच्या बाबतींत मात्र तसें घडलें नाहीं. नाहीं म्हणावयास डॉ. पुसाळकर यांनीं मात्र हें नाटक प्रसिद्ध झाल्यावर लौकरच सन १९४२ मध्यें हैदराबाद येथें भरलेल्या अखिलभारतीय-प्राच्यविद्या-परिषदेमध्यें त्यावर एक लेख वाचला. तो पुढें रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेच्या १९४२ च्या जर्नलमध्यें ( पु. १८, पृ. २३–२९ ) प्रसिद्ध झाला आहे. त्यानंतर श्री. ए. एस्. पी. ऐयर व डॉ. जी. के. भट यांनींहि त्यावर लिहिलें आहे. पण इतर कोणीं या नाटकाची चर्चा केल्याचें मला माहीत नाहीं.

---

१. कव्हरवर मात्र 'सन मार्च १९४१' असा निर्देश आहे.









अनुक्रमणिका

डॉ. पुसाळकर यांचा लेख प्रसिद्ध झाल्यावर सन १९४२ मध्यें पं. गोपालदत्त शास्त्री पुण्याच्या भांडारकर संशोधनमंडळांत गेले होते. त्या वेळीं त्यांनीं कै. डॉ. सुखटणकर व प्रा. गोडे यांच्याजवळ "'यज्ञफल' हें नाटक भासाचें नसून तें आपण स्वतः भासाच्या उपलब्ध नाटकांच्या धर्तीवर रचलें आहे व त्या नाटकांत आपण आपल्या कर्तृत्वाच्या कांहीं खुणा-( keys ) हि घालून ठेवल्या आहेत", ही अत्यंत आश्चर्यकारक माहिती सांगितली. जयपूरच्या एका प्रकाशकानेंहि ता. २७ ऑक्टोबर १९४२ रोजीं डॉ. पुसाळकर यांना पत्र पाठवून, गोंडल येथें प्रसिद्ध झालेलें 'यज्ञफल' भासाचें नसून तें पं. गोपालदत्त शास्त्री यांनीं रचलें आहे असें कळविलें व त्यांत त्यांनीं घातलेल्या आपल्या कर्तृत्वाच्या तीन खुणाहि दिल्या. त्यावर डॉ. पुसाळकरांनीं त्यांना लिहिलें कीं पं. गोपालदत्त शास्त्री यांनीं याबंबंधीं सर्व पुरावा प्रसिद्ध करावा व त्यानंतर लवकरच जयपूर येथें होणाऱ्या प्राच्यविद्यापरिषदेच्या अधिवेशनाकरितां जमणाऱ्या विद्वानांपुढें तो ठेवावा. पुढें जयपूरला तें अधिवेशन भरलें नाहीं. पं गोपालदत्त शास्त्रीहि कैलासवासी झाले. त्यामुळें हा प्रश्न अनिर्णीत राहिला. तथापि, त्याविषयींच्या कुतूहलानें डॉ. दांडेकरांनीं त्याची शहानिशा करण्याकरितां गोंडळचे राजवैद्य जीवराम कालिदास शास्त्री ( आतां श्रीचरणतीर्थ ) यांना पत्र लिहून त्यांच्या जवळचें हस्तलिखित मागविलें. तें काळजीपूर्वक पाहिल्यावर तें त्यांत लिहिल्याप्रमाणें वि. सं. १७२७ इतकें जुनें आहे अशी त्यांची व 'भांडारकर-संशोधन-मंडळा'चे क्यूरेटर प्रा. गोडे यांची खात्री झाली. त्यांतील दोन पानांचे फोटोहि डॉ. दांडेकरांनीं त्या संशोधन-मंडळाच्या गतवर्षींच्या 'ॲनल्स' (पु. ३१, पृ. ३०७-३१४) मधील आपल्या लेखांत छापले आहेत. डॉ. दांडेकरांनीं आपल्या लेखांत, पं. गोपालदत्तशास्त्री यांनीं नाटकांत व उपोद्घातांत घातलेल्या नाटककर्तृत्वाच्या खुणांचेंहि परीक्षण केलें असून, "त्यांत कांहीं तथ्य नाहीं, हें नाटक भासाचें नसलें तरी जुनें आहे व तें गोपाल शास्त्रींचें तर खास नव्हे," असें आपलें निश्चित मत दिलें आहे.

गतवर्षीं मी मुंबईस गेलों असतां माझे मित्र प्रा. ह. दा. वेलणकर यांच्या घरीं या नाटकाची प्रत मला पाहावयास मिळाली. त्यावर त्याच सुमारास प्रसिद्ध होणार असलेल्या डॉ. दांडेकर व डॉ. भट यांच्या लेखांविषयींहि माहिती मिळाल्यामुळें माझें कुतूहल उत्पन्न झालें. राजवैद्य जीवराजशास्त्री यांनीं प्रसिद्ध केलेलीं आणखी दोन पुस्तकें— भगवद्गीतेची कांहीं भिन्न श्लोक असलेली आवृत्ति व गुप्तसम्राट् समुद्रगुप्त याचें खंडित 'कृष्णचरितकाव्य' हींहि मीं तेथें पाहिलीं. त्यानंतर माझ्या विनंतीवरून राजवैद्यांनीं 'यज्ञफल', 'कृष्णचरित' व 'पूर्वपाणिनीयम्' या पुस्तकांची एक एक प्रत मला पाठविली. त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे. हीं सर्व पुस्तकें अत्यंत कुतूहलोत्पादक आहेत. त्यांवर चिकित्सक पद्धतीनें चर्चा झाली पाहिजे. पण हीं पुस्तकें प्रसिद्ध झाल्यानंतर आज जवळजवळ एक तप लोटलें तरी त्यांच्याकडे विद्वानांचें विशेष लक्ष गेलेलें दिसत नाहीं. 'कृष्णचरिता'वर एक लेख मीं गतवर्षीं नागपूरच्या 'तरुण भारता'च्या दिवाळी अंकांत प्रसिद्ध केला होता. प्रस्तुत लेखांत 'यज्ञफल' नाटकाच्या कर्त्याविषयीं चर्चा केली आहे. त्यापूर्वीं एका गोष्टीचा खुलासा केला पाहिजे. राजवैद्य पं. जीवराम कालिदास शास्त्री यांच्याशीं माझा परिचय नाहीं. कै. गोपालदत्त शास्त्री यांच्याशींहि माझा परिचय झाला नव्हता. 'यज्ञफल' नाटकाविषयीं प्रसिद्ध झालेल्या माहितीमुळें माझें कुतूहल उत्पन्न होऊन मी तें नाटक व त्यावरील लेख वाचले. त्यावरील झालेलें माझें मत केवळ सत्यान्वेषणाच्या हेतूनें येथें मांडलें आहे. यांत दुसरा कोणताहि हेतु नाहीं.

प्रथम या नाटकाचें संविधानक अनावश्यक भाग गाळून संक्षेपानें देतों म्हणजे पुढील विवेचन समजण्यास मदत होईल.

पहिला अंक : या नाटकाचा आरंभ 'नान्द्यन्ते ततः प्रविशति सूत्रधारः' या वाक्यानें होतो. नंतर सूत्रधाराच्या मंगलश्लोकांत राम, भरत, लक्ष्मण व शत्रुघ्न हीं या नाटकांतील प्रमुख पात्रांचीं नांवें गोंवून मुद्रालंकार साधला आहे. प्रस्तावनेंत कवीचें किंवा नाटकाचें नांव नाहीं.








प्रस्तावनेंत शेवटीं ' स्थापना ' हेंच नांव दिलें आहे. या सर्व बाबतींत हें नाटक भासकृत ' तेरा ' नाटकांसारखेंच वाटतें.

प्रस्तावनेनंतर सुमंत्र प्रवेश करतो व म्हणतो कीं, दशरथ राजाला चार पुत्र झाल्यामुळें सर्वत्र उत्सव होत आहे; अशा प्रसंगीं तुरुंगांतून कैद्यांना सोडून द्यावयाचें, पण राज्यांत कोणीहि अपराध करीत नसल्यामुळें कोणी कैदेंत नाहीं. राजाच स्वतः पितृ-ऋणांतून मुक्त झाला आहे. नंतर राजा प्रवेश करतो. त्याच्याकडे कौसल्यादि तिन्ही राण्यांच्या दासी येऊन आपापल्या स्वामिनींची विशिष्ट कारणास्तव स्वतःस अग्रमान देण्याविषयींची विनंति कळवितात. राजा त्यामुळें घोटाळ्यांत पडतो. पण शेवटीं सर्वांना सारखाच मान देण्याचें ठरवितो.

**दुसरा अंक :** '' राजा सुमंत्राला बोलावून सांगतो कीं, '' मीं पूर्वी कैकेयीला ' तुझ्या मुलाला सर्व राज्य मिळेल ' असें वचन दिलें आहे. पण राज्यपालन करण्यास योग्य व क्षत्रियगुणान्वित असा रामच असल्यानें त्यालाच यौवराज्याभिषेक करण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां सचिव, भृत्य, प्रजा इत्यादिकांना राम अत्यंत प्रिय होईल व भरताचेंहि प्रेम त्याच्यावर बसेल अशी योजना तूं कर. ''

नंतर तिन्ही राण्या येतात. त्यांना राजा कोणाला यौवराज्याभिषेक करावा म्हणून विचारतो. या प्रसंगीं कौसल्या अत्यंत स्वार्थी दिसते. रामालाच सर्व राज्य मिळालें पाहिजे असा आग्रह ती धरते. कैकेयीच्या विवाहप्रसंगीं आपण वचन दिलें असल्यामुळें भरताला राज्य दिलें पाहिजे असें राजानें म्हणतांच तिला मूर्च्छा येते. ' राम व भरत यांच्यामध्यें राज्य अर्धें अर्धें वांटावें. माझ्या मुलांना तें नको. ते दोघे राम व भरत यांची सेवा करतील. ' असें म्हणून सुमित्रा आपला निःस्वार्थीपणा प्रकट करते. ' राम हाच आपल्या गुणांमुळें राजा होण्यास योग्य आहे. आपण मला पूर्वी वचन दिलें असलें तरी लोकांच्या हिताकरितां तें मोडण्यांत पाप नाहीं, तसें करण्यास माझीहि संमति आहेच ' असें सांगून कैकेयी आपला उदात्त स्वभाव व्यक्त करते. राण्या निघून गेल्यावर विदूषक प्रवेश करतो व व ' रामाला राज्याभिषेक होणार असें कौसल्येकडून मला समजलें ' असें राजाला सांगतो. ' याला खरी गोष्ट कळल्यास हा कलागती लावील ' असें वाटून राजा त्याला म्हणतो, ' अरे, हे कुमार अद्यापि लहान आहेत. तेव्हां मी जें थट्टेनें बोललों तें तूं खरें मानूं नकोस. '

**तिसरा अंक :** आपला शत्रु दशरथपुत्र रामाच्या रूपानें जन्मला आहे असें रावणाला कळतें. त्याचें सामर्थ्य किती आहे तें जाणावें व शक्य तर त्याचा वध करावा किंवा त्यास बांधून न्यावें या उद्देशानें रावण दशरथाच्या वाड्याजवळ येतो. त्याच वेळीं विश्वामित्र ऋषीहि आपल्या बला व अतिबला या विद्या व जृम्भकास्त्रें रामाला द्यावीं या उद्देशानें तेथें येतात. नंतर राम आदिकरून कुमार शस्त्रविद्येचा अभ्यास करण्याकरितां तेथें येतात. भरत, शत्रुघ्न व लक्ष्मण यांचें शरसंधान अचूक व परिणामकारी होतें. पण विश्वामित्र व रावण यांच्या अदृश्य कारवाईमुळें रामाच्या अस्त्राचा कांहींच परिणाम होत नाहीं. तें पाहून रामाला अत्यंत क्रोध येतो व तो निर्वाणीच्या आग्नेयास्त्राचें संधान करतो. पण इतक्यांत वसिष्ठ ऋषि तेथें आल्यामुळें तो आपला बाण परत घेतो. ' विश्वामित्र ऋषि येथें आले आहेत, त्यांचा तूं योग्य सन्मान कर ' असें वसिष्ठ ऋषि रामाला सांगतात.

**चौथा अंक :** विश्वामित्र ऋषि राजसभेंत येतात व कुमारांच्या विद्यार्जनाविषयीं चौकशी करतात. शेवटीं ' कुमारांना माझ्याबरोबर यज्ञरक्षणार्थ पाठवावें, मी त्यांना दिव्यास्त्रें देईन ' असें ते दशरथाला सांगतात. थोडे आढेवेढे घेतल्यावर दशरथ वसिष्ठाच्या सल्ल्याप्रमाणें त्यांना विश्वामित्राबरोबर जाण्यास संमति देतो.

**पांचवा अंक :** विश्वामित्राचा यज्ञ निर्विघ्नपणें शेवटास जातो. सर्वत्र लोक निर्भयपणें फिरूं लागतात. अशा वेळीं विश्वामित्र ऋषि रामलक्ष्मणांना तपोवनाजवळच्या गौळीवाड्यांत, शेतकऱ्यांच्या राहणीचें प्रत्यक्ष ज्ञान त्यास व्हावें, तें त्यांस त्यांच्या व्यवहारनिर्णयप्रसंगीं उपयोगीं पडेल

या उद्देशानें घेऊन जातात. कृषीवलांना पाहिल्यावर त्यांस नगरांत घेऊन जावें कारण त्याच्यायोगें नगरेंहि तपोवनासारखीं होतील असें रामाला वाटतें. पण विश्वामित्र म्हणतात– ' नगरांत राहिले तर यांचे सर्व गुण नष्ट होतील. हे आपलें कृषिकर्म विसरतील. तेथें यांना गर्व उत्पन्न होऊन हे स्वतःला राजापेक्षांहि श्रेष्ठ समजूं लागतील. नगरांतील लोकांचे दोष यांचे अंगीं येतील. तेव्हां त्यांना येथेंच राहूं द्या. फक्त राजा व पौरजन यांच्याकडून यांना त्रास होणार नाहीं याची काळजी घ्यावी. '

**सहावा अंक :** विश्वामित्र ऋषि राम-लक्ष्मणांना घेऊन जनकाच्या यज्ञाला उपस्थित राहण्याकरितां मिथिलेस जातात. तेथें रामाचें व सीतेचें प्रेम परस्परांवर बसावें म्हणून ते त्यांची गांठ उद्यानांत पडेल अशी योजना करतात. तेथें त्यांची दृष्टादृष्ट होऊन त्यांचें परस्परांवर प्रेम जडतें. ही ब्रह्मर्षींची मुलगी असल्यास किंवा तिचा दुसऱ्या कोणाशीं विवाह ठरला असल्यास आपला प्रणयभंग होईल अशी भीति रामाला वाटते; पण थोडा विचार केल्यास आपलें मन हिच्यावर बसल्यामुळें ही अगम्या किंवा दुष्प्राप्या असण्याचा संभव नाहीं असेंहि त्याला वाटतें. पुढें त्यांचा परस्पराशीं परिचय होतो. नंतर जनक तेथें येतो. त्याला ही गोष्ट माहीत होते. नंतर तो दशरथाला आपल्या सर्व कुटुंब-परिवारासह येण्याविषयीं आमंत्रण पाठवितो.

**सातवा अंक :** जनकाचा यज्ञ समाप्त होऊन तो अवभृथस्थान करतो. नंतर तो आपल्या सीतादि कन्यांचा रामादि कुमारांशीं विवाह करतो. इतक्यांत शिवधनुर्भंगामुळें कोपाविष्ट झालेला परशुराम तेथें येतो. पण रामाला पाहतांच त्याच्या वैष्णव रूपाची ओळख पटून तो आपलें सर्व पुण्य त्यास देतो व शाश्वत ब्रह्मप्राप्तीसाठीं तपश्चर्या करण्यास निघून जातो. शेवटीं विश्वामित्राच्या मुखानें खालील भरतवाक्यानें नाटकाची समाप्ति होते :

' रक्षन्तु वर्णा धर्मे स्वं प्रजाः स्युरनुपप्लुताः ।
त्वं राजसिंह पृथिवीं सागरान्तां प्रशाधि नः ॥ '

**डॉ.** पुसाळकर व डॉ. भट या दोघांनींहि या नाटकाचें परीक्षण करून तें भासाचें आहे, असें आपलें मत दिलें आहे. डॉ. पुसाळकर " हें नाटक भासाच्या तृतीय कालखंडांतील परिणत प्रज्ञेचें फळ असून ' प्रतिमा ' व ' प्रतिज्ञायौगंधरायण ' या दोन नाटकांच्या मध्यें केव्हां तरी त्याची निर्मिति झाली असावी " असें आपलें मत देतात; तर डॉ. भट " या नाटकांत कथानक, रचना, स्वभावचित्रण, विनोद इत्यादिकांत नाटककाराचें कौशल्य दृष्टीस पडत नाहीं, त्यामध्यें कथाभाग व वादविवाद मोठ्या प्रमाणांत आहे, कथानकांतील प्रसंग सुश्लिष्ट रीतीनें संबद्ध नाहींत या कारणांमुळें हें नाटक भासाच्या अगदीं प्रारंभींच्या कालखंडांतलें असावें," असें म्हणतात. डॉ. दांडेकरांनीं या दृष्टीनें नाटकाचें परीक्षण केलें नाहीं. ' हें नाटक भासाचें असेल किंवा नसेल, पण तें निदान वि. सं. १७२७ इतकें तरी जुनें आहे. गोपालदत्त शास्त्रींचें तर तें खासच नाहीं, ' असें आपलें मत निश्चित झाल्याचें ते सांगतात. तेव्हां या प्रश्नाचा थोडा बारकाईनें विचार करूं.

आपाततः हें नाटक भासाचीं म्हणून मानलेल्या तेरा नाटकांसारखें दिसतें, यांत शंका नाहीं. आरंभींची 'नान्द्यन्ते ततः प्रविशति सूत्रधारः' ही रंगसूचना, मंगलश्लोकांतील मुद्रालंकार, ' प्रस्तावने 'ऐवजीं ' स्थापना '-शब्दाचा प्रयोग, कर्त्याच्या नांवाचा अनुल्लेख, शेवटचें ठरीव तऱ्हेचें भरतवाक्य, अपाणिनीय प्रयोग, इत्यादिकांवरून हें नाटक पूर्वींच्या तेरा नाटकांच्या कर्त्यानेंच रचलें असावें व तो भास असल्यास हें नाटकहि भासाचेंच असावें, असा सकृद्दर्शनीं ग्रह होतो. पण थोडें सूक्ष्म वाचन केल्यावर हें नाटक अगदीं अलीकडे कोणीं तरी रचून भासाच्या नांवावर खपविण्याचा प्रयत्न केला आहे, असें वाटूं लागतें. याविषयीं कांहीं प्रमाणें खालीं दिलीं आहेत :

**( १ ) कालिदासाच्या ग्रंथांशीं साम्य :** या नाटकामध्यें कालिदासाच्या नाटकांतील व काव्यांतील उक्तींचें व प्रसंगांचें अनेक ठिकाणीं अनुकरण केलें आहे. पुढील उक्तिसाम्य पहा :

# ‘ यज्ञफल ’ नाटकाची समस्या

| ‘ य ज्ञ फ ल ’ | कालिदासीय ग्रंथ |
|---|---|
| ( १ ) सम्राडेव सुतोदयेन विहितो मुक्तः<br>पितृणामृणात् ॥ ( १. ५ ) | ऋणाभिधानात्स्वयमेव केवलं<br>तदा पितृणां मुमुचे स बन्धनात् ॥ (रघु. ३. २१) |
| ( २ ) प्रजाः प्रजाः स्वा इव पालिताश्च । (१.१०) | प्रजाः प्रजाः स्वा इव तन्त्रयित्वा । ( शा. ५.५ ) |
| ( ३ ) सूर्ये निरभ्राम्बरवर्तिनि स्यात्<br>कथं तमिस्रा गतिभङ्गहेतुः ॥ ( १, १६ ) | सूर्ये तपत्यावरणाय दृष्टेः<br>कल्पेत लोकस्य कथं तमिस्रा ॥ ( रघु. ५. १३ ) |
| ( ४ ) वज्रपातसदृशं वचनम् । पृ. ४५ | पावकः खलु वचनोपन्यासः । शा. ५ |
| ( ५ ) चपलोऽयं बटुः । पृ. ६० | चपलोऽयं बटुः । शा. २. |
| ( ६ ) क्व नृपत्वमनल्पविप्लवं<br>क्व कुमाराः सुकुमारचेतसः ।<br>परिहासविजल्पितं त्विदं<br>परमार्थे न हि मन्यतां वचः ॥ ( २. ४१ ) | क्व वयं क्व परोक्षमन्मथो<br>मृगशावैः सममेधितो जनः ।<br>परिहासविजल्पितं सखे<br>परमार्थेन न गृह्यतां वचः ॥ ( शा० २. १८ ) |
| ( ७ ) यथा प्रदीपादपरे प्रदीपे<br>प्रज्वालिते नास्ति तयोस्तु भेदः । (३.१४) | न कारणात्स्वाद्बिभिदे कुमारः<br>प्रवर्तितो दीप इव प्रदीपात् ॥ ( रघु. ५. ३७ ) |
| ( ८ ) गोप्यन्ते स्वभुजबलेन बाहुजा हि । ( ३. १६ ) | स्ववीर्यगुप्ता हि मनोः प्रसूतिः ॥ ( रघु. २.४ ) |
| ( ९ ) गुणैः स्तुत्यः सर्वो<br>भवति न वयः कारणमिह ॥ ( ३. २३ ) | तेजसां न हि वयः समीक्ष्यते ॥ ( रघु. ११.१ ) |
| (१०) आत्मीये दृश्यते गुणः ॥ ( ३- २४ ) | सर्वः कान्तमात्मीयं पश्यति । ( शा. २ ) |
| (११) क्रीडारतो वाऽविकृतः शयानः<br>सिंहोऽपि न स्वं महिमानमेति ॥ ( ३.२९ ) | प्रायः स्वं महिमानं<br>क्षोभात्प्रतिपद्यते हि जनः ॥ ( शा. ६, ३१ ) |
| (१२) न खलु न खलु वंध्याः पक्षिणोऽनागसस्ते<br>सह पृथुककलत्रैस्तत्र वासः कृतस्तैः ।<br>क्व बत विहगदेहाश्चञ्चला लाघवेन<br>क्व पुनरशनिकल्पा मृत्युदूताः शरास्ते ॥<br>—( ३. ३८ ) | न खलु न खलु बाणः संनिपात्योऽयमस्मिन्<br>मृदुनि मृगशरीरे तूलराशाविवाग्निः ।<br>क्व बत हरिणकानां जीवितं चातिलोलं ।<br>क्व च निशितनिपाता वज्रसाराः शरास्ते ॥<br>—( शा. १. १० ) |
| (१३) यदि मम याञ्चा मोघा न स्यात् ।<br>( पृ. १२९ ) | याञ्चा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ॥<br>—( मेघ. ६ ) |
| (१४) अरुणेन तमो भिन्नमिति लोके निगद्यते ।<br>किन्तु भास्करकर्मैतद्येनाग्रे निहितोऽरुणः ॥<br>( ५. १४ ) | किं वाऽभविष्यदरुणस्तमसां विभेत्ता<br>तं चेत्सहस्रकिरणो धुरि नाकरिष्यत् ॥<br>—( शा. ७. ४ ) |
| (१५) कृत्याकृत्यविवेके तु प्रमाणं हि सतां मनः ।<br>( ६. १८ ) | सतां हि संदेहपदेषु वस्तुषु<br>प्रमाणमन्तःकरणप्रवृत्तयः ॥ ( शा. १, २२ ) |
| (१६) विद्या बुधस्य विमला सफला न तावत्<br>यावन्न सा गुणवते पुरुषाय दत्ता ।<br>कन्यां विनीय परिपोष्य च तां न यावत्<br>योग्याय नैव ददते न कृती पिता स्यात् ॥<br>( ६. ३३ ) | वत्से, सुशिष्यपरिदत्तेव विद्याऽशोचनीयासि संवृत्ता ।<br>—( शा. ४ ) |
| (१७) प्रियसखि वरमिव तातस्याशिषमभिनन्दय ।<br>( पृ. १९४ ) | भगवन् , वरः खल्वेष नाशीः । ( शा. ४ ) |



अनुक्रमणिका








प्रसंगसाम्य—( अ ) ' यज्ञफला 'च्या दुसऱ्या अंकांत, कोणाला राज्याभिषेक करावा हें कैकेयीला विचारतांना दशरथ वरकरणीं रामाच्या अभिषेकाला विरोध करतो. तो स्वगत भाषणांत म्हणतो–' केनापि व्याजेन स्वाभीष्टविरोधं दर्शयित्वा कार्यसिद्धिं करोमि।'(पृ.४३). ही कल्पना 'शाकुंतल' नाटकाच्या दुसऱ्या अंकांतील तत्सदृश प्रसंगावरून सुचलेली दिसते. दुष्यन्ताच्या सेनापतीला विदूषका-प्रमाणेंच मृगया नकोशी झालेली असते. तथापि तो तिची वरकरणीं स्तुति करतो व तसें करण्यापूर्वी विदूषकाला एकीकडे म्हणतो–' सखे स्थिरप्रतिबन्धो भव । अहं तावत्स्वामिनश्चित्तवृत्तिमनुवर्तिष्ये । '

( आ ) दुसऱ्या अंकांतील यौवराज्याभिषेक कोणाला करावा ही चर्चा अप्रस्तुत आहे. तिचा पुढें कोणत्याहि घटनेशीं संबंध नाहीं. तिच्या शेवटीं विदूषकाला ' थट्टेनें बोललेलें खरें मानूं नको ' हें राजाचें म्हणणें ' शाकुंतला 'च्या दुसऱ्या अंकांतील तत्सदृश प्रसंगावरून सुचलेलें आहे. 'शाकुंतलां'त राजाच्या उक्तीचा पुढील घटनांशीं घनिष्ठ संबंध आहे. तसा ' यज्ञफलां 'त नाहीं. या एकाच उदाहरणावरून कोणीं कोणाचें अनुकरण केलें हें सहज ध्यानांत येईल. येथें अर्थसाम्याबरोबर उक्तिसाम्य आहे ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे.

( इ ) तिसऱ्या अंकांत विश्वामित्र व रावण अदृश्य राहून रामाच्या बाणांना निःशक्त करतात, कारण त्याला क्रोध आणून त्याचें शौर्य पाहण्याच्या त्यांचा उद्देश असतो. हा प्रसंगहि 'शाकुंतला'च्या पांचव्या अंकांतील मातलीनें त्याच उद्देशानें विदूषकावर केलेल्या हल्ल्यावरून सुचलेला दिसतो.

भास हा कालिदासाच्या पूर्वी होऊन गेला असल्यानें त्याच्या ग्रंथांतील कांहीं उक्तींचें व प्रसंगांचें अभावितपणें अनुकरण कालिदासाच्या ग्रंथांत होणें साहजिक आहे व तसें तें झालेलें मीं आपल्या ' कालिदास ' ग्रंथांत दाखविलें आहे.[२] पण भासकृत कोणत्याहि इतर नाटकांतून इतक्या उक्ती व प्रसंग कालिदासानें घेतलेले दाखवितां येणार नाहींत. वर दाखविलेल्या साम्यबाहुल्यावरून ' यज्ञफला 'च्या कर्त्यानेंच कालिदासाच्या ग्रंथांचें अनुकरण करून व त्यांतील प्रसंग व शब्दयोजना युक्तायुक्तस्थलीं योजून आपला ग्रंथ सजविला आहे, यांत संशय नाहीं.

## स्त्रियांचीं संस्कृत पद्यभाषणें

( २ ) स्त्रियांनीं प्राकृतांत बोलावें असा साहित्य-शास्त्राचा नियम आहे व तो भासाच्या इतर नाटकांत व कालिदासाच्याहि नाटकांत पाळलेला दिसतो. कालिदासाच्या नाटकांतील पण्डिता कौशिकी या विदुषीशिवाय इतर स्त्रीपात्रें संस्कृतांत कधींहि बोलत नाहींत. पुढें क्वचित् प्रसंगीं वैदग्ध्या-करितां स्त्रियांनींहि संस्कृत बोलण्यास हरकत नाहीं असें मत प्रचलित झालें. त्याला अनुसरून भवभूतीनें आपल्या 'मालतीमाधवां'त स्त्रीपात्रांच्या तोंडीं क्वचित् संस्कृत श्लोक घातले आहेत.[३] पुढें साहित्यग्रंथांत याविषयीं नियम घालण्यांत आले. उदाहरणार्थ, ' साहित्य-दर्पणां 'त म्हटलें आहे :

' योषित्सखी बालवेश्याकितवाप्सरसां तथा ।
वैदग्ध्यार्थं प्रदातव्यं संस्कृतं चान्तरान्तरा॥ '

—( ६,१६९ )

पण या तऱ्हेचें उदाहरण भासाच्या इतर नाटकांत कोठेंहि आढळत नाहीं. ' यज्ञफला ' मध्यें मात्र स्त्रीपात्रें अनेक प्रसंगीं संस्कृत पद्यांत बोलतांना दिसतात. उदाहरणार्थ, सुमित्रा ( पृ. ४७, ४८ ), कैकेयी ( पृ. ४९, ५०, ५१, ५२ ), मन्थरा ( पृ. ८९ ), मधुरिका ( पृ. १९० ) यांचीं संस्कृतांतील पद्यभाषणें पाहा. या स्त्रिया आपलीं गद्यभाषणें प्राकृतांतच करतात. प्राकृतांत कविता रचणें नाटककर्त्याला साधत नसावें, हें स्त्रियांच्या तोंडीं संस्कृत पद्यें घालण्याचें कारण असावें.

---

२. ' कालिदास ' ( नवभारतग्रंथमाला ), पृ. १४३ पाहा.
३. ' मालतीमाधवम् ' २, १; ७, १ पाहा.









(३) भासाच्या नाटकांतील भाषा साधी, सोपी व समासविरहित अशी असते. 'यज्ञफलां'तहि ती तशीच आहे असें डॉ. पुसाळकर म्हणतात. पण तें सर्वांशीं खरें नाहीं. उदाहरणार्थ, सातव्या अंकांत जनकाच्या तोंडीं घातलेलें खालील भाषण पाहा :

' अतीतेऽहि मम यज्ञान्तस्नानमभूत् । तदैव च मयार्षेण विधिना रघुकुलप्रदीपस्य महाराज्ञो दशरथस्य ज्येष्ठाय पुत्राय सकलक्षत्रकुलकमलाहस्कराय भुजबलोत्थापित–भग्नानेकमहाबलवीराविचालितोग्र–चापाय भीमयातुधानवधनिवारिततपोवनभयसंशयाय सुकृतिजनमनःकुमुदप्रसादहेतवे सर्वनयनाभिरामाय रामचन्द्राय रसोद्भवा दुहिता प्रदत्ता ' (पृ. १९९)

वरील उताऱ्यांतील प्रदीर्घ समासरचना हें नाटक कालिदासपूर्वकालीन असणें शक्य नाहीं हें स्पष्ट दाखवितें.

(४) भासाच्या इतर ग्रंथांत कित्येक ठिकाणीं अपाणिनीय प्रयोग आढळतात. प्रस्तुत नाटकांतहि ते कांहीं ठिकाणीं (मुद्दाम ?) योजिले आहेत. उदाहरणार्थ : तोष्य (पृ. ४), आस (पृ. १३), महाराज्ञः (पृ. २३) पाहा. पण कांहीं ठिकाणीं टिप्पणीकार गोपाळदत्त शास्त्री यांच्या म्हणण्याप्रमाणें या ग्रंथकारानें पाणिनीचे नियम–जे इतर काव्य-नाटकग्रंथांत क्वचितच अनुसरलेले दिसतात ते–तंतोतंत पाळलेले दिसतात. उदाहरणार्थ, सैकः (पृ. १३५), इच्छमानः (चानश् प्रत्यय, पृ. १५९) इत्यादि पाहा. तेव्हां ' यज्ञफला 'च्या कर्त्यानें इतर ठिकाणीं अपाणिनीय प्रयोग मुद्दाम घालून त्या नाटकाला प्राचीनत्वाचें रूप देण्याचा प्रयत्न केलेला आहे असें वाटूं लागतें.

वरील प्रमाणांवरून ' यज्ञफल ' हें नाटक कालिदासपूर्वकालीन नाहीं. अर्थात् तें भासाचेंहि असणें शक्य नाहीं, हें दिसून येईल. पण तें भासाचें नसलें तरी वि. सं. १७२७ इतकें तरी जुनें आहे हें डॉ. दांडेकरांचें मतहि बरोबर वाटत नाहीं. कारण या नाटकांत कांहीं आधुनिक विचार व वाक्प्रचार आढळतात. कसे ते पाहा :

(१) यौवराज्याभिषेकाच्या बाबतींत आपणांस राजा व सुमंत्र विचारीत नाहींत असें पाहून विदूषक कृतककोपानें म्हणतोः—" अहमन्तःपुरे देवीनां बहिश्च भ्रातणां विग्रहमुत्पादयामि । अथवा प्रायोपवेशनभयं सर्वेषामुत्पादयामि " (पृ. ६०) यांत विदूषकानें आपल्या मनासारखें झालें नाहीं तर आमरण उपोषणाचा सत्याग्रह करण्याचा धाक घातला आहे. असा धाक प्राचीन ग्रंथांत सहसा आढळत नाहीं. तो आधुनिक सत्याग्रहयुगांत रचलेल्या ग्रंथांत येणें संभवतें.

(२) चौथ्या अंकांत सुमंत्र विश्वामित्राला पाहतो तेव्हां म्हणतो : ' भगवन् नमस्ते । ' (पृ. ११०). नमस्काराची ही पद्धत भासकृत इतर नाटकांत आढळत नाहीं. विश्वामित्र हा महर्षि होता. त्याला ' नमस्ते ' (' तुला नमस्कार असो ') म्हणणें सुमन्त्राला शोभत नाहीं. अशा प्रसंगीं भासाच्या इतर नाटकांत ' भगवन् अभिवादये ' (देवधर-संपादित ' भासनाटकचक्र ', पृ. १८०), ' भर्तृदारक वन्दे ' (पृ. २२५), ' आर्य, अभिवादये ' (पृ. २८६) ' भो आचार्य, अभिवादये ' (पृ. ३७८), ' तात, दुर्योधनोऽहमभिवादये ' (पृ. ४६४) अशीं अभिवादनवचनें आढळतात. सध्यां लहानांपासून थोरांपर्यंत ' नमस्ते ' म्हणण्याची पद्धत उत्तर हिंदुस्थानांत पडली आहे. गीतेच्या अकराव्या अध्यायांत ' नमोऽस्तु ते ', ' नमो नमस्ते ' इत्यादि वाक्यांच्या अंधानुकरणाचा हा परिणाम ! परमेश्वराला उद्देशून बोलतांना आपण द्वितीयपुरुषी एकवचनाचा प्रयोग करतों, तसा भासानेंहि एके ठिकाणीं केला आहे (' बालचरितम् ' ५, १८). पण वडील माणसांच्या किंवा माननीय व्यक्तींच्या बाबतींत तोच प्रयोग करणें शिष्टसंमत नाहीं. तथापि, असा प्रयोग सध्यां उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र रूढ झाला आहे खरा. प्रस्तुत नाटक उत्तर हिंदुस्थानांत लिहिलें गेल्यामुळें त्या प्रयोगाचें अनुसरण सुमन्त्राच्या वरील अभिवादनांत झालेलें दिसतें.

(३) पांचव्या अंकांत अनेक ठिकाणीं तपोवन व घोष (गौळीवाडे) यांची नगराशीं तुलना केली आहे, तींत आधुनिक विचार आढळतात. नगरांतील रम्यत्व हें कृत्रिम असतें. राजेलोकांच्या उद्यानांत कुंपण वगैरे घालून वृक्ष काळजीनें वाढविले जातात, पण त्यांचीं फळें सर्वांना मिळत नाहींत. याच्या उलट तपोवनांत हरिणादि सर्व प्राण्यांना

पानें व फळें यथेच्छ खातां येतात. खेडेगांवांतील कृषीवल अल्प लाभानें संतुष्ट असल्यानें अन्नाचा विक्रय करीत नाहींत. नगरांतील लोक उत्तुंग सौधांत ललितकलांचा आनंद घेतात, पण त्यांना वनांतील द्वेषरहित सृष्टिसौंदर्याचें सुख माहीत होत नाहीं (पृ. १५४). तपोवनाजवळ गौळीवाड्यांत राहणारे लोक, त्यांना कोणी धर्माचा उपदेश केला नाहीं तरी, धर्माचें अतिक्रमण करीत नाहींत. त्यांच्यामध्यें कलह किंवा लोकांना लुबाडण्याची इच्छा नसते. ते आतिथ्यशील असतात व स्वतःवर केलेले अपकार (लौकरच) विसरतात (पृ. १५७). इत्यादि. वरील वर्णन वाचतांना अलीकडील 'खेडे-गांवांकडे वळा' या प्रचाराची आठवण होते. भासाच्या 'पंचरात्र' व 'बालचरित' या नाटकांतहि गौळीवाड्यांतले प्रवेश घातले आहेत. त्यांमध्यें गौळ्यांचें गोधनावरील उत्कट प्रेम आढळतें, त्यांचें 'हल्लीसक' नृत्य दृष्टीस पडतें व इंद्रध्वजादि उत्सवांचाहि उल्लेख येतो. पण त्यांमध्यें कोठेंहि नागर व ग्रामीण जीवनाची तुलना करून ग्रामीण जीवनाचें श्रेष्ठत्व प्रतिपादल्याचें दिसत नाहीं.

वरील कारणांस्तव 'यज्ञफल' हें नाटक प्राचीन नसून अलीकडेच कोणीं रचलें असावें असें वाटतें. त्याच्या कर्त्यानें अर्थातच भासाच्या उपलब्ध नाटकांचें कुशलतेनें अनुकरण केलें आहे. कालिदासाच्या ग्रंथांत क्वचित् स्थळीं भासाच्या कल्पना आढळतात हें आतां माहीत झाल्यामुळें, कालिदासीय उक्ति व प्रसंग युक्तायुक्तस्थळीं घातले आहेत, हल्लींच्या चिकित्सक पद्धतीला अनुसरून पादटीपांत पाठभेद दिले आहेत, अपाणिनीय प्रयोग व संस्कृत ग्रंथांतील समानार्थक उतारे टिप्पणींत घातले आहेत. सारांश, हें नाटक भासाचेंच आहे हें दाखविण्याकरितां ग्रंथकारानें प्रत्यनांची पराकाष्ठा केली आहे. डॉ. पुसाळकर व डॉ. भट यांसारख्या विद्वानांनाहि हें नाटक भासाचें वाटलें, यावरून त्यांचे प्रयत्न बरेच सफल झालेले दिसतात.

हें नाटक आपण रचून भासाच्या नांवावर प्रसिद्ध केलें, हा कै. गोपाळदत्त शास्त्रींचा दावा बरोबर दिसतो. पुढें मागें जरूर पडल्यास ही आपली कृति आहे हें सिद्ध करतां यावें म्हणून त्यांनीं उपोद्घातांत व मूळ नाटकांतहि कांहीं खुणा ( keys ) घालून ठेवल्या होत्या. डॉ. दांडेकरांच्या मतें त्यांत कांहीं तथ्य नाहीं. तेव्हां त्यांचें परीक्षण करणें जरूर आहे.

खूण १ : नाटकाला जोडलेल्या 'प्राग्वक्तव्यम्' नामक उपोद्घातांतल्या पहिल्या एकोणीस वाक्यां-तील आठवें अक्षर घेतल्यास 'बलात् ग्रंथ लेकर उपोद्घातभी मेरेसेही लिखाया' हें वाक्य तयार होतें.

डॉ. दांडेकरांनाहि हें मान्य आहे. पण त्यांच्या मतें गोपाळदत्त शास्त्री यांनीं प्रस्तावना लिहिली असावी व म्हणून त्यांना अशी खूण घालणें शक्य झालें असावें. पण ही प्रस्तावना राजवैद्य जीवराम कालिदास शास्त्री यांच्या नांवावर आहे. गोपाळदत्त शास्त्री यांचा उल्लेख उपोद्घाताच्या शेवटीं आला आहे खरा, पण तो केवळ टिप्पणीचा कर्ता म्हणून. हा उपोद्घात राजवैद्यांनीं स्वतः लिहिला असता तर त्यांतून वरील हिंदी वाक्य बनवितां आलें नसतें हें उघड आहे. तेव्हां राजवैद्यांनीं गोपाल शास्त्री यांच्याकडून उपोद्घात लिहून घेऊन आपल्या नांवावर छापला असें स्पष्ट दिसतें. म्हणून गोपाल शास्त्री यांच्यावरील आरोपांपैकीं 'उपोद्घात मेरेसेही लिखाया' हा भाग निर्विवादपणें सिद्ध होत आहे. त्यामुळें 'यज्ञफल' ग्रंथ त्यांच्याकडून लिहवून घेतला हा भागहि खरा असावा असें मानण्याकडे मनाचा कल होतो. हीं दोन कामें—ग्रंथरचना व उपोद्घातलेखन—गोपाळ शास्त्रीं-कडून करवितांना, ते म्हणतात त्याप्रमाणें, त्यांच्या-वर अयोग्य दडपण घालण्यांत आलें किंवा त्यांना योग्य मेहनताना देऊन तीं कामें त्यांच्याकडून करवून घेण्यांत आलीं, हें समजण्यास आतां साधन नाहीं.

खूण २—पहिल्या अंकांतील अठाविसाव्या श्लोकांतील पहिल्या, तिसऱ्या, चौथ्या व दुसऱ्या पानांतील पांचवें अक्षर घेतल्यास 'गोपालस्य' असा शब्द होतो.

## ' यज्ञफल ' नाटकाची समस्या

' यज्ञफला 'च्या अवशिष्ट[४] हस्तलिखितांत किंवा गोंडळच्या राजवैद्यांकडून मिळालेल्या छापील प्रतींतहि या विशिष्ट अक्षरांनीं ' गोपालस्य ' असा शब्द बनत नाहीं असें डॉ. दांडेकरांनीं दाखविलें आहे. पण तेच सांगतात कीं आपण पाहिलेल्या दुसऱ्या एका छापील प्रतींत हाच श्लोक पाठभेदानें दिला आहे. ते पाठ घेतल्यास ही खूणहि सिद्ध होते. तो श्लोक असा :

घृणीनां पूगोऽयं व्रत दिनकरस्य क्षयमगात् ।
प्रकाशो दीपानां रजनिवदनालङ्कृतिरिव ॥ "

तेव्हां गोपालदत्त शास्त्रींना अभिप्रेत असलेल्या पाठांचा हा श्लोक ज्यांमध्यें आहे अशा कांहीं प्रती छापल्या होत्या, यांत संशय नाहीं. पुढें ग्रंथकर्त्यानें आपल्या कर्तृत्वाची ही खूण या श्लोकांत घातली आहे हें लक्षांत आल्यामुळें, तें पान बदलण्यांत आलें असावें असें दिसतें. त्याच वेळीं या बदललेल्या आवृत्तीच्या प्रती ध्यानांत याव्या म्हणून पुस्तकाचें कव्हरहि बदललें असावें. कारण डॉ. दांडेकर सांगतात कीं, पूर्वीच्या कव्हरवर वर्ष व मास यांचा उल्लेख नव्हता, पण बदललेल्या आवृत्तीच्या कव्हरवर ' सन १९४१ मार्च ' असा निर्देश आहे. ही तारीखहि चूक आहे. कारण पुस्तक १९-७-४१ पर्यंत तयार झालें नव्हतें. हें उपोद्घाताच्या शेवटीं जी तारीख घातली आहे त्यावरून स्पष्ट आहे.

खूण ३—दुसऱ्या अंकांतील पहिल्या पांच श्लोकांच्या पहिल्या पादांचें आठवें अक्षर घेतल्यास ' भासानुकारि ' असा शब्द तयार होतो.

ही खूण डॉ. दांडेकर यांना मान्य आहे. पण ' ती काकतालीय न्यायानें झालेली आहे. या अक्षरांचा असा शब्द होतो हें लक्षात आल्यावर गोपालदत्त शास्त्री यांनीं त्याचा फायदा घेतला असावा ' असें ते म्हणतात. पण ही खूण काकतालीय न्यायानें होणें संभवत नाहीं. शिवाय हिच्यामध्येंहि पहिल्या खुणेंतल्याप्रमाणें आठवेंच अक्षर घ्यावें लागतें हें लक्षांत घेतां ही खूण मुद्दाम घातली असावी असें वाटतें.

कै. गोपालदत्त हे विद्वान् शास्त्री होते. भांडारकर-संशोधन-मंडळा'च्या रौप्यमहोत्सवप्रसंगीं त्यांनीं स्वकृत श्लोक म्हटले त्यावरून त्यांचें संस्कृत भाषेवरील आश्चर्यकारक प्रभुत्व व प्राचीन शैलीचे श्लोक रचण्याची हातोटी हीं स्पष्टपणें दिसून आलीं, असें दांडेकर सांगतात. त्यांनीं या नाटकावर टिप्पणी लिहिली आहे, तिजवरून त्यांची प्रगाढ विद्वत्ता व संस्कृत काव्याचा खोल अभ्यास दिसून येतात. अशा विद्वान् शास्त्र्यास भासकृत उपलब्ध नाटकांचा सूक्ष्म अभ्यास करून तत्सदृश नाटकरचना करतां येणें अशक्य नाहीं.

आतां राहिला हस्तलिखिताचा प्रश्न. राजवैद्यांनीं पाठविलेलें हस्तलिखित वि. सं. १७२७ इतकें जुनें आहे असें आपलें व प्रा. गोडे याचें निश्चित मत झाल्याचें डॉ. दांडेकर सांगतात. तें हस्तलिखित मीं पाहिलेलें नाहीं. तथापि, ज्या विद्वान् शास्त्र्याला प्राचीन काव्यशैलीचें बेमालूम अनुकरण करतां येतें त्याला पृष्ठमात्रादि घालून प्राचीन लेखनपद्धतीचेंहि अनुकरण करणें कठिण जाऊं नये. त्याकरितां जुना कागद मिळविणें किंवा नव्या कागदाला कृत्रिम उपायांनीं जुनेपणा आणणेंहि अशक्य नाहीं.

गोंडळच्या रसशाळेतर्फें प्रसिद्ध करण्यांत आलेलें हें एकच पुस्तक संशयास्पद नाहीं. ' पूर्वपाणिनीयम् ' नामक व्याकरणावरचा २४ सूत्रांचा ग्रंथ, सध्यांच्या ७०० श्लोकांच्या भगवद्गीतेपेक्षां मोठी ७४५ श्लोकांची ' भोजपत्री गीता ', गुप्तसम्राट् समुद्रगुप्त याचें ' कृष्णचरित 'नामक खंडकाव्य—असे आणखी तीन संस्कृत वाङ्मयेतिहासांत अत्यंत खळबळ उडवून देणारे ग्रंथ राजवैद्यांनीं १९४०-४१ या कालांत प्रसिद्ध केले.[५] यांपैकीं ' भोजपत्री गीते 'चें परीक्षण करून ती बनावट असल्याचें

---

४. ' यज्ञफला 'चें दुसरें हस्तलिखित गोपाल शास्त्री घेऊन गेले असें राजवैद्य सांगतात.

५. सन १९४१ मध्यें गोपालदत्त शास्त्र्यांचा राजवैद्यांशीं बेबनाव होऊन ते जयपूरला निघून गेले असें ' कृष्णचरितम् ' व ' पूर्वपाणिनीयम् ' यांच्या उपोद्घातांवरून दिसतें.

बेलवलकर यांनीं साधार दाखविलें आहे.[६] ' कृष्ण चरित ' काव्याचीहि अशीच गोष्ट आहे. त्याचीं दोनच जीर्ण पानें आपणांस मिळालीं व तीं आपण छापलीं असें राजवैद्य सांगतात. त्यांतील कित्येक विधानें अत्यंत विस्मयोत्पादक आहेत. उदाहरणार्थ— शूद्रक कवीनें शकांना जिंकून विक्रमसंवत् चालू केला. त्याचा आश्रिक कालिदास हा शाकुन्तलादि चार नाटकांचा कर्ता होता. दुसरा कालिदास समुद्रगुप्ताचा सांधिविग्रहिक हरिषेण हाच होय. त्यानें रघुवंशादि पांच काव्यें रचलीं—अशी आश्चर्यकारक माहिती त्यांत आढळते. इतरहि वररुचि, व्याडि, ' अन्त्यज ' देवल, ' बुद्धचरित ' लिहिणारा चीन कवि वगैरेविषयीं त्यांत श्लोक आहेत. त्रुटित ' कृष्णचरित ' काव्य आधुनिक संशोधनाशीं परिचित असलेल्या कोणीं विद्वानानें रचलें असावें. त्याचा कर्ता गोपालदत्त शास्त्रीच असणें असंभवनीय नाहीं.[७]

कांहीं वर्षांपूर्वीं धावक, भास इत्यादिकांविषयीं असेच कांहीं श्लोक. ' कविविमर्श ' नामक ग्रंथांतील म्हणून प्रसिद्ध झाले होते. पण त्याविषयीं चौकशी करतां ते बनावट असल्याचें आढळून आलें. भविष्योत्तर-पुराणांत ' कलियुग-राजवृत्तान्त ' म्हणून एक प्रकरण आलें आहे. त्यांतील कांहीं उल्लेख अलीकडील संशोधनानें मिळालेल्या माहितीशीं जुळत असल्यामुळें तें प्रकरण खरें मानण्याकडे कांहीं विद्वानांचा कल होता- पण सूक्ष्म अभ्यासानंतर तें आधुनिक संशोधनाशीं परिचित असलेल्या कोणीं तरी रचलें असावें असें आतां मानण्यांत येतें. गोपालदत्त शास्त्रींचा उपक्रम याच प्रकारचा आहे. अशा प्रकारचे उद्योग आपल्या देशांत फार प्राचीन काळापासून चालू आहेत. स्वतःच्या कृतीची प्रसिद्धि होऊन तिला मान्यता मिळावी या हेतूनें अनेक विद्वानांनीं स्वतः अज्ञात राहून आपले ग्रंथ– पुराणें, स्मृती, काव्यें, नाटकें इत्यादि—प्राचीन ऋषींच्या किंवा प्रथितयश ग्रंथकारांच्या नांवावर खपविलेले आढळतात. त्यामुळें संस्कृत वाङ्मयेतिहासांत अतिशय घोटाळा उत्पन्न झाला आहे. अठरा पुराणें व्यासानेंच रचलीं कीं दुसऱ्या कोणीं कालिदास एक किंवा तीन, श्रीशंकराचार्यांच्या नांवावर असलेले ग्रंथ त्यांनीं रचले किंवा दुसऱ्या कोणी, इत्यादि प्रश्न यामुळेंच उत्पन्न झाले आहेत. उपलब्ध पुराव्याची छाननी करून ते सोडविण्यांत संशोधकांचे परिश्रम खर्चीं पडत आहेत. अशा वेळीं असे नवीन नवीन बनावट ग्रंथ रचून त्यांचें काम जास्त बिकट करणें योग्य होणार नाहीं. कितीहि कौशल्यानें बनावट ग्रंथ रचले तरी आधुनिक चिकित्सक युगांत सत्य उघडकीस आल्याशिवाय राहत नाहीं. तेव्हां संस्कृत विद्वानांनीं अशा प्रकारचे उद्योग करण्याचें सोडून आपली विद्वत्ता योग्य कार्यास लावावी असें त्यांस नम्रपणें सुचवून हा लांबलेला लेख समाप्त करतों.

---

६. डॉ. बेलवलकरांचा ' गंगानाथ झा रिसर्च इन्स्टिटयूट 'च्या जर्नल–(पु. १. पृ. २१–३१) –मधील या विषयावरील लेख पहा.

७. नागपूरच्या ' तरुण भारता 'च्या सन १९५१ च्या दिवाळी अंकांतील या विषयावरील माझा लेख पहा.

---

## सर्व कागदावरच

" मी पराक्रमी वीर खरा; पण ज्याचा हजारों वेळा पराभवच झालेला आहे असा वीर मी आहे असें तुम्ही समजा. धैर्यशाली वा पराक्रमी असं कांहीं मीं जर करून दाखविलं असेल तर तें फक्त पुस्तकांतूनच, कागदावरच, कल्पनेच्या क्षेत्रांतच.—पण माझा पराक्रम फक्त कागदी किंवा पुस्तकीच आहे म्हणून मला जे हिणवितील त्यांनीं हें मात्र लक्षांत ठेवावें कीं, मानवजातीनें आतापर्यंत जें कांहीं वैभव, सौंदर्य, सत्य, ज्ञान, नीतिमत्ता, अविनाशी प्रेम हीं संपादन केलीं असतील तीं सगळीं कागदावरच, पुस्तकांतूनच होत ! " —बर्नार्ड शॉ ( मिसेस कॅंपबेल व एलन टेरी यांच्याबरोबर झालेल्या पत्रव्यवहारांतून ).








महामहोपाध्याय द. वा. पोतदार

# भारताची एकता, प्रादेशिक भाषा आणि समन्वयाची दृष्टि

बडोदें येथें भरणाऱ्या मराठी वाङ्मयपरिषदेच्या सोळाव्या अधिवेशनाचें अध्यक्षपद स्वीकारण्याविषयीं आपली आज्ञा झाली तेव्हां मी कांहींसा अनपेक्षितपणें गांगरलों, यांत शंका नाहीं. कारण मी आणखी कांहीं असलों किंवा नसलों तरी आजच्या परिभाषेंत ज्याला सृजनसाहित्य असें म्हणण्याचा परिपाठ आहे, तें माझ्या गांठीं नाहीं आणि तसलें 'सृजन' ज्याच्या पदरीं नाहीं तो आपल्या अध्यक्षपदीं आरूढ होणें हें प्रथेला बाधकच होणार! ही कैफियत ही मीं आपणांपुढें सादर केली; परंतु आपली आज्ञा फिरली नाहीं. तेव्हां अटकळ केली कीं, या वेळीं माझी योजना करण्यांत आपला हेतु काय असावा, आणि जो साक्षात्कार मला झाला त्याला अनुसरून या अध्यक्षपदावरून पुढील विचार सभेस सादर करण्याची योजना ठरविली.

आपण सारे मराठी वाङ्मयाचे प्रेमिक प्रतिवर्षी हा सोहोळा या प्राचीन वटपद्र नगरींत उत्साहानें भरवीत आलां आहां! या नगरीचें अर्वाचीन काळीं ज्या महान् राज्यकर्त्या मराठ्यानें संवर्धन केलें, ज्यानें आपल्या आदर्श राजकौशल्यानें गुजरात प्रदेशांतील प्रजांचें लालनपालन परम ममतेनें आणि कर्तव्यनिष्ठेनें दीर्घकाळपर्यंत केलें आणि गुजरातची 'अस्मिता' पुष्ट केली, जो विद्या-कलांचा थोर भर्ता म्हणून देश-विदेशांत सतत पन्नास वर्षें गाजला, त्या संस्मरणीय महाराजा कै. श्रीमान् सयाजीराजांचें स्मरण केल्याविना मला पुढें शब्दच फुटणार नाहींत. त्यांच्या कृपाछत्राखालीं कै. श्री. संपतराव गायकवाड यांच्या नेतृत्वानें जें महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाचें अधिवेशन येथील इंदुमतीमहालांत भरलें होतें आणि जेथें तरुण 'यशवन्त' कवींनीं 'देहाचा पूल' ही आपली कविता खड्या आवाजांत म्हणून दाखवून प्रथमदर्शनींच सर्वांचें मन वेधून घेतलें किंवा येथेंच वाढलेले आजचे स्वामी कुवलयानंद (गुणे) यांनीं बडोद्यांतील रसिकतेची चमक दाखविली, ज्या संमेलन-प्रसंगीं आजचे भाई डांगे त्या वेळच्या महाराष्ट्र साहित्य-परिषदेच्या अधिकाऱ्यांवर हल्ला चढविण्यास पुढें सरसावले होते, आणि ज्या संमेलनांत अध्यक्ष कै. नरसोपंत केळकर यांनीं आपली सविकल्पक समाधीची अभिनव कल्पना आविष्कृत केली त्याच संमेलनांत, तीस-एकतीस वर्षांपूर्वीं, मीं 'मराठी विद्यापीठ' स्थापावें म्हणून ठराव साहित्यसंमेलनांत प्रथमच मांडला. तो सर्व रम्य इतिहास या वेळीं मला आठवावा हें साहजिकच आहे!

### अभयपाणिचा वरदहस्त

या गोष्टीला तीस वर्षें लोटलीं. पण या तीस वर्षांत भारतांतच नव्हे, जगांतच केवढी उलथापालथ झाली? त्या वेळीं अनेकांना स्वप्नवत् वाटणारें महाराष्ट्र-विद्यापीठ प्रत्यक्षांत अवतीर्ण झालें! एवढेंच काय, पण साक्षात् या नगरींतहि नवें विद्यापीठ

---

बडोदें येथील मराठी वाङ्मयपरिषदेचें सोळावें अधिवेशन बडोदें येथें २९–३० नोव्हें. व १ डिसेंबर १९५२ या दिवशीं भरलें होतें. म. म. दत्तो वामन पोतदार हे या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. त्यांनीं अध्यक्षपदावरून जें भाषण केलें तें येथें प्रसिद्ध करीत आहोंत. —का. सं.

प्रस्थापित झालें आहे ! तथापि, या नगरीचे ते वैभवशाली पोशिंदे आज कोठें आहेत ? तो जुना काळ नव्या काळांत विलीन झाला ! भारत परकीयांच्या पंजरांतून मुक्त झाला, स्वतंत्र झाला ! आतां त्याच्या नवजीवनाच्या नवप्रभाताचा प्रारंभ झाला आहे. अरेरे ! परंतु या भारताचे दोन्ही पंजे तुटलेले आहेत ! तरी त्यानें आपली हिंमत सोडलेली नाहीं आणि त्यानें ती सोडतांहि नये ! तो काहीं केवळ दोन हातांचा आणि दोन पायांचा किरकोळ प्राणी नाहीं. या भारताला अनेक मुखें आहेत आणि अनेक हस्त आणि अनेक पाद आहेत; आणि असें असलें तरी त्याचें पोट एकच आहे आणि त्याचें हृदयहि पण एकच आहे. त्याच्या या दिव्य मूर्तीवर प्राचीन काळापासून श्रीचा वरदहस्त आहे. तो अभयपाणिच त्याचा त्राता आणि भर्ता आहे. त्या अभयपाणि श्रीचें पूजन आपण अनेक कोटि जनांनीं यथाशास्त्र केलें तर आपणां सर्वांचें खचित गोमटें होईल ! असा दृढ आत्मविश्वास आणि आत्मप्रत्यय आपणांला अनुभवितां आला पाहिजे, त्याचा नित्य साक्षात्कार झाला पाहिजे. आपल्या कणाकणांतुन, आणि नसानसांतुन तो रसरसत राहिला पाहिजे. पण हा असा साक्षात्कार व्हावा कसा ? उपाय काय ? भारताचें हें एकहृदय हातीं यावें कसें ? तें मनांत कसें ठसवावें ?

## हें बुन्यादीचें नाणें

हा साक्षात्कार फार जुनाट आहे. हें 'बुन्यादी'चें नाणें आहे. 'भरतवर्षे भरतखंडे जंबुद्वीपे 'च्या प्रतिदिनीं कराव्या लागणाऱ्या उद्घोषांत तो सांठविलेला आहे. 'गंगे च यमुने चैव गोदावरि सरस्वति । नर्मदे सिंधु कावेरि जलेऽस्मिन् सन्निधिं कुरु' या सप्तनद्यांच्या जललहरींतुन तेंच संगीत अहोरात्र चालूं आहे ! महेंद्र,-मलय-सह्य-विंध्य-पारियात्रादि सप्त पर्वतांच्या शिखरांवरून त्याच उद्घोषाची ध्वजा फडकत राहिली आहे. अयोध्या-मथुरादि सप्तपुऱ्यांतील घराघरांतून याच घोषमंत्राचें गायन होत आलें आहे. असा हा उद्घोष एके काळीं आमच्या नित्य पाठाचा विषय होता.

परंतु पुढें पुढें ही नित्य परिचयाची वस्तु नुसती पूजापाठांतच राहिली ! पोकळ शब्द उरले ! प्राण गेला आणि कुडीच उरली ! ऐवज गेला आणि पेटीच जागेवर राहिली ! हें कसें झालें ? कोणीं केलें ? केव्हां घडलें ? हें घडलें त्या वेळीं आपण कोठें होतों ? आपणांला झोंप लागली होती किंवा काय ? किंवा आपली कोणीं नजरबंदी केली होती ?– याचा कसून तपास करून खरा प्रकार शोधून काढल्याशिवाय आपलें 'हरपलें श्रेय' आपणांस कधीं तरी प्राप्त होईल काय ?

नवीन स्वतंत्र भारतांत आपण सर्व नवेंच करूं म्हटल्यानें काम निभेल काय ? वास्तविक आपलें जें हरवलें आहे तें काय, कोठें पळवून नेण्यासारखें किंवा चोरण्यासारखें होतें काय ?–ती जागृति होती. ती हृदयांत कोंडून ठेविलेली, ती दुसरा पळवून कशी नेईल ? 'न चोरहार्यं' अशी ती महद्वस्तु तशी जाईल कोठें ? ती आपणांजवळच असणार ! ती आपल्या अंगची, रक्तांत रुतलेली, हाडामांसांत भिनलेली ! छे ! हा सारा नजरबंदीचा खेळच समजला पाहिजे. ज्ञानाचें अंजन घातलें आणि डोळ्याच्या खुपऱ्या पाणी गाळून स्वच्छ केल्या म्हणजे पुनः आपली वस्तु आपणांस दिसूं लागेल ! दृष्टिभ्रम दूर झाला म्हणजे झालें. तो आपोआप थोडाच होईल ? तो दूर करण्यासाठीं द्रष्टे पुरुष लागतात. भारताला तसें मार्गदर्शन अधूनमधून होत आलें आहे आणि पुढेंहि होईल.

## विसकटलेली मंजूषा

मित्र हो ! थोडें ध्यानस्थ व्हा आणि पाहा, ती आपली आत्मधनमंजूषा पाहा ! अहो ! या मंजूषेंतील वस्तू किती अस्ताव्यस्त पडल्या आहेत ! कित्येकांस गंज चढला आहे, कित्येक भग्न झाल्या आहेत. आणि ही आपली मूळची मंत्रांची पोथी ! अरे, हिचे अध्यायच सारे विसकटलेले आहेत, पानेंच्या पानें गहाळ झालीं असावीं असा संशय येतो.—आणि हें काय ? ठिकठिकाणीं जुन्या वचनांना हा हरताळ कोणीं फांसला ? जुने पाठ हरताळून त्यांवर नवे अपपाठ कोणीं लिहिले ? समासांत तर फार्सी, इंग्रजी, काय वाटेल तें जागजागीं खरडलें आहे. कित्येक स्थळीं नवीन पानें घुसडून दिलीं आहेत. एखाद्या जुन्या दप्तरांत ज्याप्रमाणें एखादें शिवकालीन पत्र आणि त्याच्या



अनुक्रमणिका

लगत उजळणीचें छापील पुस्तक असा प्रकार अनुभवास येतो, तशी गडबड येथेंहि झालेली दिसते. आणि पाहिलांत? हा केर, आणि ही कुजलेलीं फडकीं, आणि या उंदरांच्या लेंड्या! शिव! शिव! वाळवीनें तर केवढा अनर्थ केला आहे! पानांवर पाणी पडून अनेक पानांचा पुठ्ठाच बनला आहे. कांहीं भाग तर पार आहाळून गेला आहे. हात लावण्याची सोय नाहीं अगदीं! मूर्ती घासून गेल्या आहेत. त्यांच्या डोळ्यांतील हिरेमाणकें कोणीं लांबवलेलीं दिसतात! देवांचे अलंकार तर अजून कोठें दिसतच नाहींत? चांदीसोन्याचे टांक कोणी दुष्टांनीं ठेंचून कीं हो टाकले आहेत! आणि या पाहा, या कोणी तरी आपल्याच मूर्ती, पोथ्या, पुस्तकें, घड्याळें आणि हत्यारें या आमच्याच वस्तूंत मिसळून ठेवल्या आहेत-आणि आपण मात्र निघून गेले! जमाखर्चाच्या आमच्या वह्या तरी धड असाव्यात! पण तेंहि नाहीं. पानें फाडून नेलीं आहेत, नवींच खातीं उघडलीं आहेत, भलत्या खात्यावर भलत्याच बाकया ओढलेल्या दिसत आहेत. कांहीं खात्यांवर भरमसाट जमा दाखविल्या आहेत. मुळांत आम्ही देखील स्वच्छ हिशेब ठेवलेच होते कधीं म्हणा? कच्चीं टिपणें असतील-नसतील, पक्कें काम नाहींच म्हटलें तरी शोभेल. तोंडमिळवणी केली होती कोठें? खातेदारांचीं नांवें सुद्धां धड नाहींत, मग पत्ते कोठले? साराच गोंधळ! अनागोंदी कारभार दिसतो आहे!

या गडबडींतून वाट काढणें आणि काम मार्गावर आणून सोडणें हें अलबत्यागलबत्याचें कामच नव्हे! याला मुरब्बी खंबीर पाहिजेत. भास्कराचार्यांचें पाटी-गणित, वाल्मीकीची प्रतिभा, व्यासाची विशाल बुद्धि, भरताचें नाट्यकौशल आणि नागार्जुनाची किमया सर्व खर्चीं घालावी लागेल तेव्हां कोठें कांहीं पाय भुईला लागतील. तोंवर शिलकेची पिशवी जरा हालवून पाहूं. आहे, त्यांत कांहीं तरी हाताला लागतें आहे. चला, तेंच घेऊन पेढीचें काम तर चालूं करूं. बाकीचें प्रचंड काम उरकलें तर पाहिजेच पाहिजे. तें चालीस लावूं; मग क्रमानें उरकत जाईल. व्यावहारिक मार्ग एवढाच आहे.

एवढ्यानेंहि पूर्वीं अपेक्षिलेल्या साक्षात्काराची पुरेशी चुणुक मिळून जाईल. इतकें घडून आलें तरी मोठेंच काम झालें, असें निःशंक म्हणतां येईल.

हें साक्षात्कारदर्शनाचें मूलभूत कार्य म्हणजेच भारताच्या धारणेचें प्रधान कार्य होय. या साक्षात्काराचें स्पंदन भारतांतील व्यक्तिमात्राच्या हृदयांत घडून आलेलें ऐकूं आलें पाहिजे. भारतीय साहित्यिकांनीं आपली सर्व शक्ति या कामीं नेटून एकवटली पाहिजे. या कामीं हयगय होईल तर साहित्याचा वृक्ष मुळांतच सुकून जाईल. साहित्यिक जर याच भ्रमांत राहतील कीं आम्हांला आमच्याच तंद्रींत रंगून राहावयाचें आहे, तर हा अभिमान त्यांना आणि त्यांच्या समवेत भारताला रसातळाला नेल्याशिवाय राहणार नाहीं. हें महद्भय ओळखूनच एवढा हाकारा म्यां येथें केला आहे.

### प्रतिभेला साक्षात्काराची डूब

साहित्यिकानें कथा रचाव्या, नाटकें निर्माण करावीं, काव्यें गावीं, असा काय वाटेल तो विलास आपल्या प्रतिभेकरवीं खेळावा आणि त्यांत रमावें आणि लोकांस रमवावें. पण तसें करण्यापूर्वींच वरील साक्षात्काराची डूब आपल्या प्रतिभेला आधीं द्यावी.

तुम्ही कोणती भाषा वापरतां हा प्रश्न गौण आहे. पण तुम्ही वरील साक्षात्कारांत रंगलां आहांत किंवा नाहीं हा अधिक महत्त्वाचा प्रश्न आहे. ती डूब मिळालेला साहित्यिक गुजरातींत बोलो, कानडींत लिहो किंवा बंगालींत रचना करो. त्याची विचक्षणा करण्याचें मग कारण उरत नाहीं. आणि भारताच्या मूलभूत सुप्त एकत्वाच्या प्रत्ययाविषयीं चिंता करण्याचें कसलेंच प्रयोजनहि राहत नाहीं. कारण, तसें झालें म्हणजे भारतीयत्वाचा, त्या मूलभूत व्यापक ऐक्याचा अनाहत ध्वनि प्रत्येक भारतीयाच्या कानांत सतत घुमत राहील. बंगालींतून तोच साक्षात्कार जसा घडेल तसाच त्या साक्षात्काराचा उठाव हिंदींतून होईल आणि तोच साक्षात्कार तामिळ भाषेंतून अनुभवास येईल.

### किमयेचा परिस उशाळ्यांत

हा चमत्कार पूर्वीं प्रत्यक्ष घडून आलेला आहे. तसा तो घडून आला म्हणूनच आम्ही भारतीय या नांवानें आजमितीला जिवंत वावरत आहोंत. नामशेष झालों नाहीं. आपली जगन्मार्गदर्शक








भगवद्गीता, आपलें रसाळ रामायण, त्याप्रमाणेंच आपलें सर्वगुणसंपन्न महाभारत आणि आपलें 'स्वादु स्वादु पदे पदे' म्हटलेलें भागवत—हीं संस्कृतांतील महार्ह रत्नें आपल्या भारतांत सर्व दिशादिशांना पसरलीं. पंपाची रचना कानडींत असेल, कृत्तिवासाची बंगालींत असेल, नाथांची मराठींत किंवा तुलसीदासाची अवधींत असेल. पण या सर्व देशी रामायणांतून गायिलेली सीता-रामाची जोडी तीच आहे, रामराज्याचा आराखडा एकच आहे, सर्व सारखेंच आहे. भाषा निराळी असली, छंद भिन्न असले, रसाविष्कार वेगवेगळा असला, तरी परिणामाला सर्व एकरूपच असल्याचें आढळून येतें. गुण सर्वांचा सारखाच ! त्यामुळें दक्षिणेचा मनुष्य उत्तरेकडे आला किंवा पश्चिमेचा पूर्वेकडे गेला तरी राम-लक्ष्मण किंवा भरत-हनुमान् अथवा रावण-बिभीषण इत्यादींची ओळख त्याला कोठेंहि चटकन् होते व तो तत्काळ समरस होऊन जातो ! रूप, अलंकार, भाषा, संगीत, भजनपूजन, मंदिर-रचना इत्यादिकांत पुष्कळ विविधता असूनहि आंतरिक ऐक्याचा गाभा एकरूपच वाटतो. रहस्याला कांहींच खोट पडत नाहीं. उलट, विविधतेमुळें वैभवांत भरच पडते.

जी गोष्ट रामायण-भारत-भागवताची तीच गोष्ट वेदांताची, ब्रह्मज्ञानाची आणि भक्तीची ! कितीहि विविध पंथ असोत, पण ब्रह्म, माया, आत्मा, योग, भक्ति यांची स्थूल ओळख सर्वांस सारखी. थेट असमदेशांतील कामाख्येपासून तों मल्याळी देशांतील कन्याकुमारीपावेतों अथवा उडिया-देशांतील जगन्नाथपुरीपासून तों सौराष्ट्रांतील द्वारका-सोमनाथपावेतों लहान-मोठे, स्पृश्य-अस्पृश्य, साक्षर-निरक्षर, यच्चयावच्च सर्वांना या ज्ञानाचा स्पर्श नाहीं असें नाहीं. स्नान नसलें तरी मार्जन तरी आहे.

शेंकडों योजनें चौरसचौरस पसरलेल्या या विस्तीर्ण भूमींत विविध भाषा, पंथ, राज्यें, जाती, संघर्ष, युद्धें यांच्या कोलाहलांत ही एकता कोणीं आणि कशी साधली ? वेद-उपनिषदें, स्मृति, न्यायमीमांसा, शास्त्रें-पुराणें हीं तर संस्कृत पंडितांनीं—मग ते भारतांत कोठेहि राहत असोत—सारखींच राखिलीं. उत्तरेचा पाणिनि दक्षिणेंत पढतात आणि दाक्षिणेंतला भास्कराचार्य उत्तरेंत शिकतात. काशीचे पंडित कांचीला येतात आणि कुंभकोणचे केदाराला जातात. हें चक्र सतत चालू आहे आणि या चक्रभ्रमणामुळेंच प्राचीन भारतीय पांडित्य, इतक्या काळ्या आल्या गेल्या, तरी अद्यापीहि दृढतेनें उभें आहे.

परंतु पंडितांनीं पांडित्याला आपल्याच पठडींत कोंडून ठेविलें. बाहेरची जनता त्यांनीं बहुतांशीं उपाशीच ठेवली. या जनतेला मग या पांडित्याचें रहस्य आमच्या साधुसंतांनीं प्रगट केलें ! म्हणूनच त्र्यंबक-राजांनीं आपल्या 'बालबोध' ग्रंथांत सुमारें चारशें वर्षांपूर्वीं असे उद्गार काढले :

> धन्य धन्य हे मराठी ।
> हे ब्रह्मविद्येची कसवटी ।
> कीं हा द्वारशिलेचे पोटीं ।
> परिसु जाहला ॥ १ ॥

ब्रह्मविद्येची कसोटी या मराठी भाषेमुळें तुमच्या दारांत अगदीं उमाळ्यावर आणून ठेवली, किंबहुना तुमच्या उंबरठ्याच्या दगडी पोटांतच हा परिस तुम्हांला गवसला ! आतां हे घरचे, रोजचे, आईचे मराठी शब्द या अज्ञानी जनतेचें सोनें करतील. अशिक्षित ज्ञानी होतील. ब्रह्मविद्या त्यांच्या घरीं-दारीं खेळेल ! मराठीनें जें केलें तेंच मराठीच्या गुजराती, बंगाली, तामिळ, तेलुगु इत्यादि अनेक लख्या-सांगातिणींनीहि करून दाखविलें !

समन्वयाची, विविधतेंत एकता खेळविण्याची ही अद्भुत कामगिरी भारतांतील साधुसंतांनीं आणि भक्तकवींनीं करून दाखविली त्या वेळीं आम्हांला प्रकाश दाखविणारे इंग्रज कांहीं येथें येऊन पोंचले नव्हते !

## पूर्वीं 'स तपस्तेपे', तसेंच आतां— !

देशी भाषांनीं वर वर्णिलेला जो चमत्कार पूर्वीं करून दाखविला तसाच त्या पुनः करून दाखवूं शकणार नाहींत, असें मानण्याला कांहीं तरी वास्तविक कारण दाखवितां येईल काय ? 'हाँ ! गेल्या पांचशें वर्षांत पाश्चात्त्य देशांत जें नवें प्रायोगिक ज्ञान एवढ्या योग्यतेला पोंचलें आहे आणि ज्याच्या बळावर पाश्चात्त्यांनीं जगावर प्रभुत्व स्थापन केलें








आहे, तें सर्व ज्ञान आणि तीं सर्व शास्त्रें आपल्या या देशी भाषांत कोठून सामावणार ? ' पण कोणी असा प्रश्न आपल्या मनाला विचारीत नाहीं कीं, या शास्त्रज्ञांनी तरी हा ज्ञानसंचय केला कसा ? त्यांच्या पाठीशीं ग्रीक, लॅटिन या प्राचीन संपन्न भाषांचीं भांडारें होतीं आणि याच भाषाबळाच्या पायावर त्यांनीं नवीं ज्ञानमंदिरें उभारलीं ना ? हा शब्दावलींचा प्रश्नच नाहीं. हा ज्ञानसंपादनाचा प्रश्नच प्रामुख्यानें आहे. पाश्चात्त्यांनीं या नवीन ज्ञाननिर्मितीसाठीं केवढे भगीरथ प्रयत्न केले ? आणि पाश्चात्त्यांची तरी एक भाषा आहे काय ? स्पॅनिश्, रूसी, फ्रेंच, इंग्रजी, जर्मन–विविध भाषा त्यांच्याकडे चालू आहेत आणि सर्वांतून हें ज्ञानसंग्रहाचें आणि ज्ञान-निर्मितीचें कार्य अव्याहतपणें चालू आहे. आतां आपल्याकडेहि संस्कृताचें भांडार, एकपरीनें वरचढ म्हटलें तरी चालेल, असें संपन्न आहे. आणि देशी भाषांचेंहि तेज त्यांनीं प्रत्ययास आणून दिलेलें आहे.

स्वातंत्र्यासाठीं आपल्या देशभक्तांनीं कसा लढा केला ? कसें बलिदान केलें ? केवढा त्याग केला ? काय गाणीं रचिलीं ? किती लेख लिहिले ? किती संसार धुळीस मिळाले ?–या सर्वांचा आठव करा, आणि तेंच तेज, तीच निष्ठा, तोच त्याग, तशीच अभेद्य संघटना उभी करा. ' अहो ! ना तुमच्याजवळ शस्त्रें, ना ज्ञान, ना पैसे आणि स्वातंत्र्याच्या गप्पा मारतां ' असे आक्षेप काय थोडे ऐकले आपण ? पण आपण असीम श्रद्धा ठेवली, वेडे झालों, सर्वस्वावर पाणी सोडलें, तेव्हांच आपल्या तपाचें फळ आपल्याला मिळालें. आपण स्वतंत्र झालों. औपनिषदिक ऋषींनीं वारंवार उद्घोषित केलें आहे कीं, ' स तपस्तेपे । स तपस्तेपे ॥ '. तसें तप ज्यांनीं केलें त्यांचें तेज आजहि फांकलेलें आपल्याला दिसत नाहीं काय ? विष्णुशास्त्री, टिळक, केळकर, परांजपे, खाडिलकर, गडकरी, आपटे, राजवाडे, केतकर, साने, कोल्हटकर इत्यादि जे वाङ्मयतपस्वी आपणांमध्यें होऊन गेले त्यांचीं सहज आठवलीं तीं नांवें इतकीं विख्यात आहेत कीं, आणखी नांवें आपणांस सादर करण्याचें तादृश प्रयोजन नाहीं. आणि आज विद्यमान आहेत तीं नांवें सर्व वंशविस्तारच दाखवितात. पण हीं सारीं नांवें डोळ्यांखालून घातलीं तर हें स्पष्ट दिसून येतें कीं, ज्ञानाच्या अनेक शाखांत अद्यापि कांहींच प्रगत झालेली नाहींत. तपस्वी एखादाच. तिकडे अद्यापि लक्षच नाहीं. आहे त्यांच्यामध्यें जोर नाहीं. तरी ' आतांचि हें आघवें निर्मीन मी ' असें विश्वासानें म्हणणारा कोणी ज्ञानेश्वर या बाजूला नाहीं.

पाश्चात्त्य ज्ञानाचे कोठावळे आपणांमध्यें पुष्कळ आहेत. पण भारतीय कळवळ्याचे तपस्वी अद्यापि निर्माण व्हावयाचे आहेत. समाजानें आपला आवाज उंच करून त्यांना पाचारण केलें पाहिजे. त्यांचा पहिला स्वयंपाक कच्चा राहिला तर त्यांस तो पुनः पुनः करावयास सांगून त्यांचें बळ वाढविलें पाहिजे. हें काम केवळ शास्त्रज्ञांचें नाहीं, द्रष्ट्यांचें आहे. द्रष्ट्यांनीं त्यांचा मोह दूर केला पाहिजे. ' नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा ' अशी पावती त्यांच्याकडून मिळेपावेतों संस्कार करीत राहिलें पाहिजे. साहित्यसंमेलनांचें प्रयोजन येथेंच आहे. अखिल जनतेचा विराट् उद्घोष त्यांना आणि जगाला ऐकविला पाहिजे. तो घोष एवढा प्रचंड व्हावा कीं, जो कानांत शिरतांच ' विरुदांचे दादुले हिंवताती ' अशी या मोहग्रस्तांची स्थिति होईल !

' नवी विरूढी '

पुष्कळ विद्वान् आहेत, तज्ज्ञ आहेत, त्यांच्याजवळ मोठालीं प्रमाणपत्रेंहि आहेत. पण ' हें कसें होईल, तें कसें होईल, शब्द कोठून येतील, परिभाषा कोणीं रचावी ',–असल्या नाना शंकांच्या भाराखालीं दडपलेले आणि आत्मशक्तीचा प्रत्यय न आलेले जे मोहग्रस्त आहेत त्यांच्या मनावरील मोहसर्पाचा विळखा दूर झालेला नाहीं तोंवर इष्ट कसें साधेल ? ज्ञानोबांनीं म्हटलें आहे :

' सर्वथा बीजें आहाळिलीं । तीं सुक्षेत्रीं जरी पेरिलीं ।
तऱ्ही न विरूढती सिंचिलीं । आवडे तैसीं ॥ '

' यद्वा तद्वा भविष्यति '—हेंच फल अशा परिस्थितींत हातीं लागणार. पण या मोहाचें विष ' जो दृष्टीसवें फेडी ' तो गारुडी भेटला पाहिजे. तो भेटला म्हणजे असा अमृतवर्षाव करील कीं मग ' नवी विरूढी फुटेल । उन्मेषाची ' ! बीजें सतेज, क्षेत्रें







शोधलेलीं आणि वरून निर्मळ वर्षाव असा थाट जुळला कीं नवी फूट जोरानें वर येईल. आणि 'नवरसां भरवीं सागर । करवीं उचित रत्नांचे आगर । भावार्थांचे गिरिवर' 'निफजविण्या' च्या आकांक्षा सफल होतील !

**नवा व्यामोह**

इंग्रज गेले; इंग्रजीहि जाईल म्हणजे तिचा व्यामोह जाईल ! डोक्यावर बसली होती ती खाली आमच्या शेजारीं बसेल. स्वामिनी, सम्राज्ञी म्हणून ती तोऱ्यानें वागे. आतां जिव्हाळ्याची जुनी मैत्रीण म्हणून राहील. ती बोलावी, हुकूम करी, तेव्हां आम्ही जात असूं. आतां आम्ही बोलावूं तेव्हां ती येईल. तिचा छंद सुटेल, पण तिची संगति अधिकच दृढ होईल.

इंग्रजी बाहेरची. पण सध्यां घरांतच एक नवा व्यामोह आकाराला येत आहे. आम्हीं मराठी, गुजराती, बंगाली, तामिळ, तेलुगु या सर्वांना आतां या नव्या युगांत वारंवार भेटावें, बसावें, बोलावें लागेल. तसें न होईल तर लोकशाही कशी रुजेल आणि यशस्वी होईल ? सर्वांनीं आपापल्या जागीं बसून आणि सणासुदीला भेटून यापुढें निभाव लागणार नाहीं. अशा आपल्या सर्वांच्या बैठका वारंवार भरतील त्या वेळीं व्यवहार कसा व्हावा ? पूर्वींहि आपण जात-येत-भेटत नव्हतों कीं काय ? मग त्या वेळीं काय आपण मुके राहत असूं ? कसें शक्य आहे ? होती, त्या वेळींहि आपल्यामध्यें एक व्यवहारभाषा होती. तीच आपली 'खडी बोली' आजहि आपल्या कामाला येणार नाहीं काय ? ती लवचिक, सर्वांना सुलभ वाटणारी, ओळखीची खडी बोलीच आतांहि आपलें काम भागविण्यास उपयोगी पडेल. युग पालटलें, तसें जीवन पालटलें आहे. जगताचें नांवच 'चालणारें, धांवणारें' आहे. आज तेंच जगत् फार वेगानें भ्रमण करीत आहे. तेव्हां आपलें जीवनहि मंद ठेवून कसें निभेल ? आपणांलाहि वेग खूप वाढविला पाहिजे आणि हें काम आपली सुटसुटीत, सहजसुंदर, सोपी खडी बोली उत्तम प्रकारें पार पाडील. हिलाच हिंदी-हि म्हणतात. तेव्हां तेंच नांव आपण सर्वांनीं पसंत केलें. या सार्वभारतीय सर्वसामान्य व्यवहारासाठीं आपण सर्वांनीं 'राष्ट्रभाषा' म्हणतात त्या हिंदीचें मोकळ्या मनानें स्वागत केलें पाहिजे. जी सर्वांच्या हिताची बात तिचें अगत्य आपण निःशंकपणें दाखविलें पाहिजे.

येथेंच एक व्यामोह संभवतो. हिंदीचा छंद तर आपणाला लागणार नाहीं ? मग आपली मूळची थोर मऱ्हाठी हळूहळू आपणाला पारखी होईल, असें भय मनांत येईल. तथापि ही भीति व्यर्थ आहे. तलवार जशी रणांगणावर उपयोगांत आणावयाची, पण घरांत येतांच ती म्यान करून खुंटीला अडकावून ठेवावयाची. तसेंच हिंदी ही जेव्हां सार्वभारतीय कार्य उरकावयाचें त्या वेळींच वापरावयाची, घरांत तिला आणण्याचें काय कारण ? राष्ट्रभाषा ही सदा भारतभर फिरत राहणार. ती एका ठिकाणीं कशी राहील ? आणि तसें राहून तिच्यावर सोंपविलेलें कार्य व्हावें कसें ? अर्थात् घरांत ती आली तर तिला मज्जाव करावयाचा असा अर्थ नाहीं. पण घरांत जी मालकीण आहे तिचाच ताबा घरावर अबाधित चालला आणि चालविला पाहिजे ! राष्ट्रभाषेला स्वस्थ बसूं द्यावयाचें नाहीं, तिला राबवून तिच्यावर सोंपविलेलें कार्य यथास्थित पार पाडून घेतलें पाहिजे. राष्ट्रभाषेला तिच्या कामाप्रमाणें वेष दिला पाहिजे आणि तिच्या योग्यतेप्रमाणें तिचा मान राखला पाहिजे. ती जोंपर्यंत आपल्या नियत मर्यादेंत वागत आहे तोंपर्यंत तिजविषयींच्या आपुलकींत कसलेंहि अंतर पाडतां कामा नये.

बडोद्यांत ही व्यापक दृष्टि कै. श्री. सयाजीराव-महाराजांनीं बरोबर बाणविली होती. आपण मराठी आहोंत तसे गुर्जराधिपति आहोंत आणि जसे गुर्जराधिपति आहोंत तसे भारतीयहि आहोंत, या त्रिविध जाणीवेचा विसर त्यांना कधींच पडलेला नव्हता. आज तीच व्यापक दृष्टि अखिल भारतांत बद्धमूल केली पाहिजे. जेवढ्या म्हणून भारतांतील भाषा आहेत त्या सर्व आपल्याच भाषा आहेत, ही बुद्धि आपण पक्की रुजूं घातली पाहिजे. अशा चौदा प्रमुख भाषांचा निर्देश आपल्या संविधानांत केला आहे. आतां सिंधी भाषेची भर या चौदांत घातली पाहिजे. आणि या पंधराहि भाषा आमच्या आहेत, भारतीय आहेत, त्यांच्या भरणपोषणाची








काळजी न्यायानें आणि प्रामाणिकपणानें आम्हां सार्‍यांनीं वाहिली पाहिजे असें शिक्षण आपण सर्वांना दिलें पाहिजे.

परका भाव नको

मग एक किंचित्सें परिवर्तन आपण लिहिण्या-बोलण्यांत केलें तर हा वरील हेतु अधिक सुलभ रीतीनें तडीस नेतां येईल. मराठी भाषेंत आपण लिहितों, बोलतों तेव्हां मराठीशिवाय इतर भाषांस 'परकीय' असें संबोधितों. परकीय म्हणजे दुसर्‍या-ची, एवढाच त्याचा खरा अर्थ आहे. ' अर्थो हि कन्या परकीय एव ' या सुप्रसिद्ध वचनांत हा मतलब मोठ्या मार्मिकपणें उमटविला आहे. कन्या मूळचें घर सोडून दुसर्‍या घरांत जाते. मग ती परक्याची वस्तु होते. आपली सत्ता तिच्यावर राहत नाहीं. तरी मायघराचा हक्क थोडाच तुटतो ? हें असो. पण जेव्हां आपण इंग्रजीलाहि 'परकीय' भाषा म्हणतों तेव्हां आपल्या मनांत काय बोध होतो ? गुजराती परकी आणि इंग्रजीहि परकी, येथें परकेपणाची जात दोहींकडे एकच आहे काय ? आपण सर्व विवेकी आहांत. तेव्हां हा शिथिलपणा तूर्तच्या काळीं काढून टाकणें योग्य होईल. येथें केवळ व्युत्पत्ति किंवा शास्त्रीय शब्दचिकित्सेचा प्रश्न नाहीं. आपणांस ज्या भावनेचें पोषण करावयाचें आहे, जें सौहार्द जतन करावयाचें आहे त्याला जे शब्द पोषक असतील त्यांची योजना आपण करावी. विषण्णता, विग्रह यांना बळ देणारे शब्द मागें टाकावे. या भाषांतील कित्येकांना भगिनी-वर्गांत आपण घालतों. कांहीं सख्ख्या, कांहीं सावत्र, तर कांहीं मानलेल्या, पण सार्‍याच बहिणी—ही कल्पना आपण फैलाविली, आपल्या लिहिण्याबोलण्यांतून परकेपणाचा धुरकटपणा धुवून काढला तर किती चांगलें होईल ? या भाषासख्यांमध्यें आप-णांस प्रेम वाढीला लावावयाचें आहे. यांच्या द्वारानें सौहार्दाची दाट पेरणी करावयाची आहे. त्यांच्यां-तील विविधतेचा गौरव स्वादिष्ट करावयाचा आहे. त्यांच्या अभिवृद्धीविषयीं चिंता वाहावयाची आहे, त्यांच्या विकासाविषयीं जागरूकता ठेवावयाची आहे. अशा वेळीं त्यांना ' परकीय ' संज्ञा लावणें खचित पोषक ठरणार नाहीं. हें समन्वयी मार्ग-दर्शन आपण साहित्यिकांनीं केलें पाहिजे आणि आबालवृद्धांच्या ठायीं ही भावना मुरविली पाहिजे.

मित्रहो, मी बडोद्यांत बोलत आहे याची जागृत जाणीव मला आहे. ही गुर्जरभूमि आहे. येथें येऊन आणि राज्यसत्ता चालवून आम्हीं गुर्जरभूमीची एक सेवाच—सहेतुक वा निर्हेतुक असेल—पण केली आहे. या नव्या युगांतहि आम्हांस त्याचा विसर पडूं नये. श्री. कै. सयाजीरावांनीं प्रजेच्या कल्याणासाठीं गुजराती भाषेची कशी सेवा केली याचें कोणींहि विस्मरण होऊं देऊं नये. आम्ही पूर्वी येथें आलों त्याचीं कारणें कांहींहि असोत; आज तरी आम्ही येथें स्थायिक झालों आहोंत. ज्या गुर्जरभूमींतच आम्ही अनेक पिढ्या राहिलों आणि जिचें अन्न आम्हीं भक्षिलें तिचा विकास हा आमचा निदिध्यास पाहिजे. या विकासकार्यांत कार्यक्षम सहभागी होण्यासाठीं गुजराती भाषा आपण आत्मसात् केली पाहिजे. येथली प्रधान भाषा तीच राहणार आणि तिचा तोच मान आपण ठेवला पाहिजे. पण याप्रमाणें गुजरातीची सेवा करीत असतां, मान राखीत असतां आणि निष्ठा ठेवीत असतांहि ज्या मराठी परंपरेंतुन आपण उदय पावलों ती आपली परंपरेची मराठी भाषा आणि त्या भाषेंतील आपलें तेजस्वी साहित्य यांचाहि प्रतिपाळ आपण भक्ति-भावानें आणि उत्कटतेनें केला पाहिजे. यांत परका भाव कांहींच नाहीं. सर्व भारतीय भाषा आपल्या, हें सूत्र जर सर्व भारतीयांनीं नीट ध्यानीं वागविलें, तर आपण मराठे मराठीवरील आपली भक्ति गाजवितों, याचें आमच्या गुर्जरीय बंधुभगिनींनीं मोकळेपणानें स्वागतच केलें पाहिजे. यांत विपरीत काहीं नाहीं. उलट, परस्परांना दुप्पट लाभ आहे. अनायासें मराठीचा सहवास आपल्या गुजराती बांधवांना लाभत जाईल आणि आम्ही गुर्जरीय मराठी बांधव गुजरातीचा यथायोग्य आदर आणि सेवा करीत राहूं. एखाद्या कायद्याच्या आधारें कोणी कोणापासून संरक्षण मागण्याचा वा देण्याचा प्रश्नच उभयतांनींहि आणूं नये. कायदा तर असावाच लागेल. पण व्यवहारच असा ठेवावा कीं, तो विचारा







पुस्तकांतच पडून राहील. आक्रमण व अतिक्रमण यांचा उच्चार करण्याचा प्रसंगच कोणी येऊं देऊं नये. इतकें सामंजस्य सर्वसाधारणपणें आपोआप नांदेल असें केलें पाहिजे. हेंच आपणांला घडवून आणावयाचें आहे.

सत्तालोभी गटांकडून ही कामगिरी होणार नाहीं. ते हजार अडथळे उभे करतील, भेडसावतील, कांगावा करतील, खऱ्याखोट्या उठावण्या करतील, भाडोत्री संघटना राबवितील, सर्व प्रकार करतील. कारण सत्तेचा लोभ अनिवार असतो. मोह काय, लोभ काय, मद काय, हेंच लोकांना भडकवतात, राष्ट्रांना चिथावतात आणि मानवतेची होळी करतात. ' अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ' या प्रश्नाचें उत्तर देतांना ' काम एष क्रोध एष ' म्हणून दोन हजार वर्षांपूर्वीच श्रीकृष्णांनीं या गुन्हेगारांचीं नांवें उघडपणें नोंदून ठेविलीं आहेत. हे चांडाळ मोठमोठ्या ज्ञानवंतांनाहि गुंडाळतात. यावर त्याच श्रीकृष्णांनीं जुनाच तोडगाहि सांगितला आहे. ' संस्तभ्यात्मानमात्मना । ' आपणच आपलें मन ताब्यांत ठेवून ' जहि शत्रुं महाबाहो कामरूप दुरासदम् ' या कामादि शत्रूंचा नाश करा.

स्वतंत्र भारतांत ज्या अंतर्गत अनेक समस्या आपणांस सोडवाव्या लागतील त्यांत यश मिळण्यासाठीं मोठी उदारता, थोर सामंजस्य आणि प्रखर न्यायबुद्धि यांची जोड लागेल. सत्त्वाचा मोठा पूर वाहविला पाहिजे. आपलें साहित्य थोर विचारांनीं, शुद्ध, सरळ भावनांनीं कांठोकांठ ओसंडून गेलें पाहिजे. आम्ही सर्व भारतीय आहों हा साक्षात्कार तीव्रत्वानें जागविला पाहिजे. त्याबरोबरच आम्ही महाराष्ट्रीय भारतीय, आम्ही गुर्जर भारतीय,आम्ही कन्नड भारतीय अशा वैशिष्ट्याला आणि विविधतेला भरपूर अवसर ठेवला पाहिजे. बाह्य एकंकाराच्या किंवा दिखाऊ एकरूपतेच्या मोहांत सांपडतां कामा नये. भारताची प्रकृति येथील द्रष्ट्यांनीं आणि साधुसत्पुरुषांनीं तशीच घडविली आहे. नवयुगांतहि तशीच घडण आपणांस ठेविली पाहिजे. भारतीय म्हटला म्हणजे तो दुसऱ्या भारतीयाचा स्वार्थासाठीं गळा कापील असा संशय देखील कोणी घेणार नाहीं अशी आपली दृढभावना झाली पाहिजे. भावना काय, तसा प्रत्यय सर्वांना मनोमन आला पाहिजे. आपल्या स्वभावाचें तें एक अंग बनलें पाहिजे. व्यापक बोलावें आणि आंत सारा स्वार्थाचा संकुचित लिडबिडाट असावा असा ' मनस्येकं वचस्येकं ' भाव नको.

केवळ राजकारणी आणि लोकाग्रणी म्हणविणाऱ्या मंडळींवर विसंबून हें साध्य हातीं येणार नाहीं. प्रतिभावान् आणि प्रज्ञावान् मंडळींनीं हें योगसाधन हातीं घेतलें आणि आपल्या वाणीनें, लेखणीनें आणि आचरणानें दिव्य प्रकाश दाखविला तरच हा कायापालट घडून येईल. मग गुजरात–विरुद्ध–महाराष्ट्र अथवा महाराष्ट्र–विरुद्ध-कर्नाटक असा विग्रह आपणांला दिसणार नाहीं, तर गुजरात + ( अधिक ) महाराष्ट्र आणि महाराष्ट्र + ( अधिक ) कर्नाटक आणि हे सर्व मिळून भारत असें रम्य आणि प्रभावी दर्शन आपणांला घडेल.

### देशभाषानुसार प्रदेशराज्यें

आज तर गुजरातहि नाहीं, महाराष्ट्रहि नाहीं, कर्नाटकहि नाहीं आणि 'भारत, भारत' असा पोकळ आक्रोश मात्र भरपूर आहे. भारत जसा घडला आहे त्याच घडीनें तो वाढेल. पूर्वीं गुजरात, महाराष्ट्र, कर्नाटक हे होते. पण त्या वेळची घटना आणि परिस्थिति आजच्याहून पुष्कळ भिन्न होती. आज जी लोकशाही भारताची मांडणी आपण करीत आहोंत, त्यांत अंतर्गत मांडणींत वरील महाराष्ट्र, कर्नाटक, गुजरात इत्यादि प्रदेशराज्यांची व्यवस्थित मांडणी करून दिली पाहिजे. त्या त्या प्रदेशांतील भाषांचा आधार घेऊन हीं प्रदेशराज्यें साकार केलीं पाहिजेत. या कामीं व्यर्थ कालहरण किंवा चालढकल बिलकुल कामीं येणार नाहीं. लंगड्या सबबी आणि खोटीं भयें दाखवून हानिच पदरीं पडेल. 'या राज्यघडणीचा आणि साहित्याचा वास्तविक संबंध काय? साहित्य हा प्रतिभेचा आविष्कार आहे, तो प्रज्ञेचा प्रकाश आहे. आणि प्रतिभा आणि प्रज्ञा यांना कोणी कसली अटक घालणार ? ' असें कोणी विचारतील. एके काळीं या म्हणण्यांत कांहीं तथ्य होतें. पण आतां सर्व जीवनच नव्या बंधनांनीं व्याप्त होत चाललें आहे. वास्तविक अन्नाचा आणि राज्याचा असा काय अविनाभाव आहे ? पण








# भारताची एकता, प्रादेशिक भाषा आणि समन्वयाची दृष्टि

आजचा अनुभव काय दर्शवितो ? राजकीय घडणीवर आज जीवन इतकें अवलंबित झालें आहे आणि नित्य या बंधनांची कक्षा इतकी वाढत आहे आणि पकड एवढी पक्की होत आहे कीं, या क्षेत्रांतील स्वातंत्र्य शब्दांतच राहण्याचें भय समोर उभें ठाकल्याशिवाय राहणार नाहीं.

आम्हांला राष्ट्रभाषा पाहिजे; मग त्याचाच अर्थ आम्हांला एक भाषा पाहिजे आणि त्याचाच अर्थ आम्हीं या एक भाषेंतच शिक्षण दिलें-घेतलें पाहिजे, सर्व व्यवहार केला पाहिजे, निदान सार्वजनिक व्यवहार तरी केलाच पाहिजे—अशीं आज्ञापत्रें प्रगट होऊं लागण्याचें भय काल्पनिक नाही ! आणि मोहवश झालेली मंडळी ' ऐक्यासाठीं त्याग ' या मोहक भुलावणीला बळी पडलेली दिसूं लागली तर नवल नाही. ' इदं च नास्ति परं च न लभ्यते ' अशी त्यांची अवस्था पुढें कदाचित् होईल. पण आज पहिला मोहच अनावर होण्याचा संभव आहे. असें कांहीं दृश्य समोर वाढून आलेलें दृष्टीला दिसत नसतें तर मग आपण खुशाल ' कला आणि बोध ' किंवा ' वास्तववाद कीं अतिवास्तववाद ' किंवा ' नवकाव्याचीं कोष्टकें ' असल्या विषयांवर आनंदानें चर्चा करीत बसलों असतों. पण प्राणावरच बेतेल कीं काय अशी शंका आ वासून पुढें उभी राहिलेली दिसत असतां दुसरा विषय सुचावा कसा ? आणि बोलावा कोठून ? मृत्युपत्र लिहिण्याची वेळ येऊन ठेपली असतां प्रेमपत्रांची सुखचर्चा कोणता शहाणा करील ?

ही कांहीं एकच समस्या नाहीं. असल्या अनेक समस्या आपणांस सोडविल्या पाहिजेत. लोकशाहीला आपण सुसंपन्न करण्यासाठीं जी प्रतिज्ञा केली आहे ती प्रतिज्ञा सफल होण्यासाठीं, देशभाषांचा विकास आणि तीं तीं देशभाषानुसारी प्रदेशराज्यें, हीच व्यवस्था अत्यंत हितावह आणि पोषक ठरणार आहे. तसें होईल तेव्हां गुजराती भाषिकांचा गुजरात, मराठी भाषिकांचा महाराष्ट्र, कन्नड भाषिकांचा कर्नाटक, अशी व्यवस्था करावी लागेल. योगायोग असा आहे कीं, आजच आनंद येथें महागुजरात परिषदेचें अधिवेशन सुरू होणार आहे. या परिषदेला आपले साहित्यिक मित्र श्री. कन्हैयालाल मुनशी यांनीं पाठविलेला आपला संदेश वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालेला आहे. त्यांत त्यांनीं ' ही परिषद् अवेळीं भरत आहे, अशा खटपटी सांप्रतच्या भारतीय स्थैर्याला विघातक आहेत ' इत्यादि अभिप्राय कळविला आहे. आम्ही याच्या अगदीं उलट अभिप्राय धारण करीत आहों आणि तो तितक्याच आग्रहानें प्रगट करीत आहों. भारतीय ऐक्याची काळजी वाहण्याचा मक्ता कोणी आपणांकडे घेण्याचें कारण नाहीं. आणि अशा संदेशामुळें तो आपणाकडे येईल असा कोणाचा समज असेल तर तो फोल आहे. जनताच सारासार विचारानें स्वहितासाठीं उचित तो निर्णय करील. भारतीय ऐक्याची भूमिका आम्हीं एवढ्याचसाठीं विशद केली आहे. आम्ही घरीं मातृभाषाच बोलतों म्हणून सांगणारे एक प्रख्यात हिंदी साहित्यिक मला नुकतेच भेटले. घरांत बायकामुलांशीं बोलण्याची भाषा म्हणजेच मातृभाषा आणि तेंच मातृभाषेचें क्षेत्र आणि तेंच आमचें मातृभाषेला संरक्षण असा कोणाचा अभिप्राय असेल तर तो आम्हांला क्षणमात्रहि मंजूर नाहीं. आमच्या मातृभाषेंत आम्हांला आमचे सर्व व्यवहार करावयाचे आहेत, कारभार चालवावयाचा आहे, साहित्य निर्माण करावयाचें आहे, शिक्षण घ्यावयाचें आणि द्यावयाचें आहे. मातृभाषेच्या वापरावर भलतेंच कृत्रिम बंधन मान्य करून आमच्या थोर वारशावर आम्हांस पाणी सोडावयाचें नाहीं. अलबत्, सार्वभारतीय मंडळांत सार्वभारतीय कामासाठीं आम्ही राष्ट्रभाषाच वापरूं. त्यासाठीं तिची अभिवृद्धि करूं. त्यासाठीं मातृभाषेचा कृत्रिम संकोच आम्ही संमत करणार नाहीं.

## प्रादेशिक भाषेचें सार्वजनिक प्राथम्य

पण जेव्हां मातृभाषेचा सलग भूभाग सोडून आम्ही दुसऱ्या भाषिक भागांत वसतीस जातों, तेव्हां आमची भाषिक नीति काय राहावी ? अशा वेळीं ज्या भूभागांत आम्ही निरंतरच्या वसतीसाठीं गेलों असूं तेथीलच भाषा आम्ही तेथें वापरूं आणि तेथें आमच्या मूळ भाषेचें रक्षण आणि संवर्धन आमच्या तिजवरील प्रेमाच्या बळावर करूं. आम्हांला या कामीं तेथल्या भाषिकांनीं प्रेमानें होईल तें साहाय्य








करावें. आम्ही तेथील भाषेच्या सार्वजनिक प्राथम्याला कधींहि मनांतून देखील धक्का लावणार नाहीं. तथापि, आमचा भाषिक वारसा आमच्या बळावर चालविण्याचा आमचा अधिकार अबाधित राहिला पाहिजे. ज्या सामंजस्याचा पुरस्कार आम्हीं वारंवार केला आहे त्याचाच पुनरुच्चार आठवणीसाठीं येथें करून हा त्रोटक परामर्ष थांबवितों.

सर्व समस्या विशदपणें आणि विस्तारानें येथें उकलून मांडण्यास अवकाश नाहीं. म्हणून आवश्यक तेवढें सूत्रमय दिग्दर्शन केलें आहे. तेवढ्यावर आपण संतोष मानून घ्याल अशी मला आशा आहे.

समाप्तीपूर्वी ज्या गुर्जरभूमींत हा मराठीचा सोहळा आज आपण साजरा करीत आहोंत, त्या गुर्जरभूमीला आणि तेथील थोर साहित्यिकांना आदरपूर्वक प्रणाम करणें मी आपलें कर्तव्य समजतों आणि त्या साहित्याची सर्व दिशांनीं अभिवृद्धि इच्छितों. गुजरातीच्या हातांत हात घालून मराठीनें चालावें अशी उत्सुकता माझ्या मनांत उचल करीत आहे. सर्व देशभर देवनागरी लिपीचा वापर होईल तेव्हां आपलीं देशी साहित्यें आणि त्या त्या भाषांचे भाषिक अधिकाधिक निकट येतील. विचार केला तर ध्यानांत येईल कीं, भारतांतील एका भाषिकांना भारतांतील दुसरी भाषा शिकणें अगदीं अवघड पडत नाहीं. म्हणून तो प्रयत्न झाला पाहिजे. एका भाषेवरील प्रेम म्हणजे दुसऱ्या भाषेशीं विरोध नव्हे. म्हणूनच तर सर्व भारतीय भाषांविषयीं आपुलकी ठेवण्याची आवश्यकता आहे.

मित्रहो ! मी अधिक काय सांगणार ? आपली आज्ञा झाली तेव्हां जे विचार माझ्या मनांत या निमित्तानें दाटून आले त्यांना मीं आपल्यासमोर वाट काढून दिली. आपण सारज्ञ मंडळी त्यांचा यथोचित विचार कराल यांत संशय नाहीं.

'न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें ।
करून घेयावें हें तुमतें । विनवतुसे ।।'

अशी प्रार्थना जर त्या वागीश्वर ज्ञानेश्वरालाहि करावी लागली, तर तेथें माझा पामराचा पाड किती !

---

# हेमाडपंती खांबें रचविला गीतार्थु !

[ कणेरेश्वराच्या खांबापाशी बसून ज्ञानेशानं ज्ञानेश्वरी लिहिली— ]

कांहीं वाटलेंसे तेथें
बैसले ज्ञानेश
पैजेसी जिंके येथ
मराठीचा श्वास
हेमाडपंती खांबें
रचविला गीतार्थु
इयें मराठीयें सांगे
गीतेचिये भावार्थु
मराठी चोखडी
ले वाळे, मनगटी
येथ वेडवाकुडे
चाले ज्ञानियाबोटीं
खांबें देखियलें
परब्रह्म गांठीं

बोबड्या बोलीं बोलें
कैवल्य मऱ्हाटी
शांत रसें न्हाणिली
चोखटी रुपडी
जोजवीतो खांब
आदरें आवडी
प्रसादाचा पसाय
प्रकाश दाटोवाटी
पाहे कवतिकें
हरखल्या दिठीं
ज्ञानराजा, केली
कां हो उठाउठी
तेवते निरंजनी
दुरिताच्या वाटीं

—पद्मा








श्री. भा. पं. बहिरट

# तुकोबांचा आध्यात्मिक विकास

## आध्यात्मिक अनुभवाबद्दल भिन्न मतें

ज्ञानेशांनीं ज्या भागवतधर्मरूपी मंदिराचा पाया घातला त्या मंदिराचा कळस तुकोबा होत.[1] तुकोबांची अभंगवाणी ही महाराष्ट्र-सारस्वताचा एक अमोल ठेवा आहे. त्या वाणींत तुकोबांच्या आध्यात्मिक अनुभवाच्या ऊर्मी स्वच्छ व गोडपणानें उमटलेल्या आहेत. हा अनुभव म्हणजे तुकोबांच्या जीवनाचा व अक्षरांचा गाभा आहे. याबद्दल तुकोबांबद्दल ज्यांनीं ज्यांनीं लिहिलें आहे त्या लेखकांमध्यें एकमत आहे. पण या अनुभवाचें स्वरूप, उगम, विकास व परिणति याबद्दल मात्र भिन्न भिन्न मतें दृग्गोचर होतात.

श्री. मा. स. केळकर यांनीं या अनुभवाचा क्रम लावतांना तुकोबा हे प्रथम मूर्तिपूजक, नंतर ब्रह्मज्ञानी व शेवटीं दोन्हींचेंहि वैयर्थ्य जाणून सर्वाभूतीं परमात्मा पाहाणारे भक्त झाले, असें म्हटलें आहे.[2] श्री. देशमुख व प्रा. दांडेकर यांनीं संपादिलेल्या गाथेच्या प्रस्तावनेंत पुढीलप्रमाणें क्रम दिला आहे : "श्री तुकोबाराय हे प्रथमवयसाकाळींच कांहीं औपनिषदीय अद्वैत सिद्धान्तावर आरूढ झालेले नव्हते...त्यांचा आरंभ अगदीं द्वैतापासून

'नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितीभाव ।
मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥
न लगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान ।
गोजिरें सगुण रूप पुरें ॥'

होऊन, शेवट—

'गोडपणें जैसा गूळ । तैसा देव झाला सकळ ॥
अणोरणीया थोकडा । तुका आकाशाएवढा ॥'

अशा पूर्ण अद्वैतविचारांत झाला आहे. यामुळें अगदीं द्वैतापासून तों थेट पूर्ण अद्वैतापर्यंत त्यांची जसजशी प्रगति होत गेली त्या त्या भूमिकेवरचे त्यांचे निरनिराळे उद्गार आहेत." (तुकाराम-गाथा, प्रस्तावना, पृ. ९). प्रा. रा. द. रानडे यांनीं तुकोबांच्या आध्यात्मिक जीवनाच्या विकासांत हेगेलच्या विरोध-विकास-पद्धतीचें एक प्रकारचें साम्य दाखवून, वर्णन केलें आहे. ते म्हणतात :

There is a sort of a Hegelian dialectic in Tukarama's soul. In the first stage of his spiritual career, he seems to have resolved to withdraw himself from the life of the world with a determined effort to

---

१. "संतकृपा झाली । इमारत फळां आली ॥...तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ॥"
—(तुकाराम-गाथा, अ. ४३३३, चित्रशाळा-प्रत)

कांहीं गाथ्यांत हा अभंग 'क्षेपक' मानतात. अभिमानाचे उद्गार तुकोबा स्वतः कसे काढतील असा आक्षेप असावा. परंतु "धन्य म्हणवीन इहलोकींच्या लोकां । भाग्यें आम्हीं तुका देखियला ॥" असें स्वाभिमानानें म्हणणाऱ्या तुकोबांच्या तोंडीं वरील अभंग शोभण्याजोगाच आहे.

२. 'साधुवर्य तुकाराममहाराज यांचें आध्यात्मिक चरित्र व शिकवण.'

win spiritual knowledge. This is the stage of positive affirmation. Then comes the stage of negation, the dark night of Tukarama's soul, a stage where Tukaram is warring with his own self. Finally, there is the stage of a new affirmation, namely, the cancellation of the original determination and the middle negation into a final vision of the God-head which supersedes them both. "

—' Mysticism in Maharashtra '
( पृ. २८१ )

तुकारामांचें पारमार्थिक जीवन कथन करतांना डॉ. शं. गो. तुळपुळे यांनीं प्रा. रानडे यांच्याच मताचा अनुवाद केला आहे. ते म्हणतात : ' तुकारामांच्या आध्यात्मिक चरित्राची सूक्ष्मपणें पहाणी केल्यास त्यांत एकूण तीन अवस्था दिसून येतात. पहिली साधकदशा असून या अवस्थेंत मनाशीं कांहीं एक निर्धार करून ते प्रपंचास विन्मुख व परमार्थास सन्मुख झालेले दिसतात. दुसऱ्या अवस्थेंत, प्रयत्नास फळ येत नाहीं असें पाहून त्यांचा सारा निश्चय ढासळून पडतो व प्रपंच आणि परमार्थ या दोन्हीसहि आपण मुकलों, या भावनेंतून उत्पन्न होणारी तीव्र निराशा त्यांच्या मनाची पकड घेते. अंधारांत तळमळणाऱ्या त्यांच्या आत्म्याची ही काळोखी रात्र लवकरच संपते व आत्मसाक्षात्काराचा सूर्योदय होऊन तुकोबांची ब्रह्मानंदी टाळी लागते. याप्रमाणें साधक, वंचित व सिद्ध अशा तीन अवस्था त्यांच्या पारमार्थिक जीवनांत असून, पहिलींतील निर्धार व दुसरींतील नैराश्य या दोहींसहि आपल्या पोटीं सामावून तिसऱ्या आनंदमय अवस्थेंत एक संत म्हणून वावरणाऱ्या तुकारामांचा हा सर्व इतिहास नीटपणें पाहाणें अवश्य आहे " —( ' पांच संत कवी ' पृ. ३२९ )

वर दिलेल्या तीन प्रमुख मतांमध्यें तीन महत्त्वाचे मुद्दे उपस्थित केले गेले आहेत : मूर्तिपूजा, अद्वैत-विचार व परमार्थाच्या वाटेंतील काळोखी रात्र. या तीन गोष्टींचें अधिक स्पष्टीकरण होणें आवश्यक आहे. ज्या भागवतधर्माच्या परंपरेंत तुकोबा जन्मले व वाढले आणि कळस म्हणून शोभले त्या भक्ति-धर्माच्या दृष्टीनें या तीनहि गोष्टींचें स्वरूप अवलोकन केल्यास तुकोबांच्या आध्यात्मिक जीवनाची राहणी समजण्यास मदत होईल.

## तुकोबांच्या मूर्तिपूजेचें रहस्य

प्रथम श्री. केळकर यांनीं उपस्थित केलेल्या मूर्तिपूजेचा मुद्दा घेऊं. मूर्तिपूजेच्या सामान्य विचाराहून भागवतधर्मातील मूर्तिपूजेस कांहीं विशिष्ट अर्थ आहे. सामान्य अर्थ पुढील श्लोकांत व्यक्त केला गेला आहे :

' उत्तमा सहजावस्था मध्यमा ध्यानधारणा ।
अधमा प्रतिमापूजा तीर्थयात्राऽधमाऽधमा ॥ '

सर्वांत श्रेष्ठ सहजावस्था, त्याखालची ध्यानधारणा, त्याहून कनिष्ठ मूर्तिपूजा व तीर्थयात्रा सर्वांत निकृष्ट होय. मूर्तिपूजेहून मानसिक ध्यान श्रेष्ठ व अखेर ध्येय व ध्याता यांचें ऐक्य हें सर्वांत श्रेष्ठ, असा क्रम येथें विवक्षित आहे. मूर्तीकडून चैतन्याकडे जाण्याच्या या दृष्टीच्या उलट, भागवतधर्मामध्यें चैतन्याकडून मूर्तीकडे पाहाण्याची दृष्टि आहे. या दृष्टीमध्यें एक विशिष्ट आशय आहे. विश्वव्यापक चैतन्यच भक्तिप्रेमास्तव मूर्त झालेलें आहे.[३] भक्तास पाहाण्यास्तव अचक्षूस चक्षू फुटले व विदेहानें देह धारण केला.[४] ज्ञानेशादि भागवतधर्मी संतांनीं ज्या मूर्तीच्या पायीं फुलें वाहिलीं त्या मूर्तीच्या पाठीमागें अत्यंत थोर आशय आहे. ती

३. अद्वयाचि द्वय झालेंचि कारण । धरिलें नारायणें भक्तिसुख ॥
अपरोक्ष आकार झाला चतुर्भुज । एक तत्त्वीं बीज भिन्न नाहीं ॥–तुकाराम-गाथा २१६९

४. तो पहावा हे डोहाळे । म्हणोनी अचक्षूसी मज डोळे ॥
हातींचेनि लीळाकमळें । पूजूं तयातें ॥–ज्ञानेश्वरी, अ. १२–२२३
तयां संगाचेनि सुखाडें । मज विदेहा देह धरणें घडे ॥–कित्ता, २२५



अनुक्रमणिका






मानवी जीवनरूपी ज्योतीला प्रकाश पुरविणारी ज्योत आहे.[५] जीवाची जीवनकला त्याप्रमाणें विश्वाचीहि जीवनकला आहे.[६] विश्वाच्या व जीवाच्या जिव्हाळ्यासच संतांनीं 'विठ्ठल' हें नांव ठरविलें आहे.[७] हा जिव्हाळा प्रेमस्वरूप असून त्या प्रेमाची अनुभूति हें जीवनाचें ध्येय होय. या अनुभूतीनेंच सर्व विश्वाकडे अथांग सहानुभूतीनें व ओलाव्यानें पाहाण्याची दृष्टि येते. प्रेमाच्या सगुण मूर्तीचें पूजन संतांनीं केलें व जनतेकडून करविलें. या पूजेत खंड नाहीं. त्यामुळें तुकोबांनीं मूर्तिपूजा प्रथम धरली व मग सोडली हें म्हणणें योग्य नाहीं. त्यांच्या जीवनाची सुरुवात सगुण प्रेमदेवतेच्या पूजेंतच व पर्यवसानहि त्या पूजेंतच आहे.

संतांची मूर्तिपूजा व वर उल्लेखिलेली सामान्य मूर्तिपूजा यांतील भेद आणखी स्पष्ट करतां येईल. एखादी काल्पनिक स्थापिलेली मूर्ति घेऊन तिची पूजा करणाऱ्याचा संतांनीं निषेधच केला आहे. ज्ञानेश्वरींत अशा निरनिराळ्या देवतांचें पूजन करणारास "आघवेनि गांवद्वारीं। आहेव जैशी" असें म्हटलें आहे. (ज्ञा. १३-८२२) तुकोबांनींहि भिन्न भिन्न देवतांचा निषेध केला आहे.[८] हा निषेध तात्त्विक कारणास्तवच आहे. परमेश्वराची पूजा त्याच्या मूळ स्वरूपांत झाली पाहिजे. सर्व रूपें परमेश्वराचींच हें खरें असलें, तरी सर्व रूपें ज्या प्रीतीनें धारण केली त्या प्रीतीचीच, म्हणजे परमेश्वराच्या मूळ प्रेमस्वरूपाचीच, पूजा केली पाहिजे. गीतेच्या ९ व्या अध्यायांतील २३ व्या श्लोकांत अन्य देवताभक्तांचा प्रश्न उपस्थित झाला असतां त्यावर केलेलें ज्ञानेशांचें विवरण पाहाण्याजोगें आहे. अग्नि-इंद्रादि निरनिराळ्या देवतांचें पूजन हें एका देवाचेंच असलें तरी तें सरळ नसून वांकडें आहे. फांद्या, पानें एका झाडाच्याच असल्या तरी पाणी घालावयाचें तें मुळासच घातलें पाहिजे. दहा इंद्रियांनीं ग्रहण केलेले विषय एका ठिकाणींच (ज्ञानांत) जात असले, तरी अन्न तयार करून तें कानांत घालूं नये अगर फुलें नाकास लावण्याऐवजीं डोळ्यांस लावूं नयेत. रस मुखानेंच सेवन करावा, परिमल नासिकेनेंच घ्यावा. त्याप्रमाणें देवाचें पूजन देवाच्या मूलरूपांतच करावें. देवाच्या मूलस्वरूपाचें प्रतीकच संतांची देवता 'विठ्ठल' होय. यामुळें या देवतेच्या पूजनाचें, भक्तीचें फळ प्रेमभक्तीच्या रसाची अनुभूति होय. हा रस तुकोबांनीं स्वतः सेवन केला व इतरांनाहि कीर्तनद्वारां भरपूर वांटला. हें तुकोबांच्या मूर्तिपूजेचें रहस्य ध्यानीं घेतल्यास त्यांचा आध्यात्मिक विकास म्हणजे भक्तिरसाचा उत्तरोत्तर वाढता परिपाक होय, हें लक्षांत येईल.

## भक्तिप्रेमानुभवाकरितां मोक्षाचा निषेध

भागवतधर्मी संतांच्या मतें केवळ अद्वैत व केवळ द्वैत हे दोन्ही विचार एकांगी आहेत. अद्वैतच द्वैतरूपानें विलसत आहे हा ज्ञानेशांचा सिद्धान्त आहे.[९] या सिद्धान्ताचा अनुवाद नामदेव, एकनाथ आणि तुकोबांनीं केला आहे. अद्वैत ही मानवी जीवनाची न भंगणारी स्थायी भूमिका असून त्यावर द्वैतरूपानें जीवन वावरत आहे. जीवन हें अद्वैतांत नाहींसें होण्यास्तव नसून, द्वैत राखून परमात्मप्रेम अनुभविण्यास्तव आहे हें लक्षांत आणून, संतांनीं ब्रह्मज्ञानाची, त्याचबरोबर मोक्षाची कास धरली नाहीं. द्वैताच्या भूमिकेवरून तुकोबा हे अद्वैती झाले असें

---

५. ज्ञानदेव म्हणे ज्योतीची निजज्योती। ते हे उभी मूर्ती विटेवरी ॥— ज्ञानदेव-गाथा, अ. ३ (साखरेप्रत)

६. 'येईं गे विठ्ठले विश्वजीवनकळे ॥' तु. गा. ४५३७. 'विठ्ठल आमुचें जीवन ॥' तु. गा. ६९०

७. बापरखुमादेवीवरु जीवींचा जिव्हाळा। कांहीं केल्या वेगळा नव्हे ॥ —ज्ञानदेव-गाथा ८९९
विठ्ठल जीवाचा जिव्हाळा। विठ्ठल प्रेमाचा पुतळा ॥ —तुकाराम-गाथा ६९०.

८. विठ्ठलावांचून ज्या ज्या उपासना। अवघाचि जाणा श्रमचि तो ॥ —तु. गा. ७८७

९. द्वैतदशेचें आंगण। अद्वैत वोळगे आपण।
भेदू तंव तंव दूण। अभेदासी ॥— अमृतानुभव ९-२८

म्हटल्यास, त्यांनीं आपणापुढें मोक्ष हेंच ध्येय ठेविलें होतें, असें म्हणावें लागेल. संतांचें मोक्ष हेंच ध्येय होतें असा गैरसमज कांहीं आधुनिक लेखकांतहि दिसून येतो.[१०] परंतु या बाबतींत ज्ञानेशांपासून तुकोबांपर्यंत सर्वांनीं आपलें म्हणणें स्पष्टपणें मांडलें आहे. अद्वैतदशा म्हणजे परमात्मस्वरूपांत विलीन होणें यापेक्षां द्वैतांत म्हणजे निराळें राहून परमात्मप्रेमाची गोडी चाखणें श्रेष्ठ आहे, असें तुकोबांनीं वारंवार म्हटलें आहे. " कुमुदिनीस आपला परिमल काय माहीत ? त्याचा भोग भ्रमरासच घडतो. आईला आपलें दूध तृणाप्रमाणें असतें, पण तिच्या बाळास त्या दुधाची गोडी कळते. त्याप्रमाणें देवा, तुझ्या नामाची गोडी तुला काय माहीत ! त्या प्रेमसुखाची गोडी आम्हीच जाणतों ! " " जळ हें जळास पीत नाहीं. वृक्ष आपल्या फळास खात नाहीं. त्याहून निराळा जो भोक्ता तो त्याच्या गोडीचा निवाडा करतो. " " देवा ! तुझ्या चरणसुखाचें वर्णन काय सांगूं ? त्याचा अनुभव तुला नाहीं ! " ( ' तुकाराम-गाथा ', १८१७;१८२६). या भक्तिप्रेमानुभवास्तव मोक्षाचा निषेध सर्व संतांनीं व तुकोबांनीं एकमुखानें केल्यामुळें,[११] द्वैताकडून अद्वैताकडे अशी भूमिका तुकोबांच्या जीवनक्रमांत मांडतां येणार नाहीं. याप्रमाणें भूमिकेचा क्रम असता तर भक्तीस गौणत्व देऊन मोक्षाची वाखाणणी करणारे अभंग सांपडावयास पाहिजे होते. परंतु ते तसे सांपडत नाहींत. इतकेंच नव्हे तर, तुकोबांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, " भक्तिप्रेमसुख नेणवे आणिका । पंडित वाचका ज्ञानियासी ॥ आत्मनिष्ठ जरी झाले जीवन्मुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्या ॥ "

**प्रेमस्वरूपाची अत्यंत गोड अनुभूति**

आतां प्रा. तुळपुळे यांनीं उल्लेखिलेल्या ' काळोखी रात्र ' या अवस्थेचा विचार करूं :

परमार्थाच्या मार्गांतील हा एक भयानक टप्पा आहे, अशी समजूत आहे. साधकाची अंतःशुद्धि होऊन परमात्म्याचें ओझरतें दर्शन होऊन पुन्हां तो अंधकारांत सांपडतो. मिस् अंडरहिलनें या अवस्थेचें वर्णन केलें आहे कीं, या वेळीं साधक अंधारांत परत फेंकला जाऊन त्याच्या जीविताची दिशा शून्यमय व सांचलेल्या पाण्याप्रमाणें होते, त्याचा शक्तिपात होऊन तो एकलकोंडा बनतो, आपल्या हीनतेच्या तीव्र जाणिवेनें त्यास यातना होतात, बौद्धिक शक्ति कमी होऊन नैतिक आणि व्यावहारिक अनवस्था उत्पन्न होते, बाह्य जगांत मित्राचे शत्रू बनून नाना संकटें येतात. ( Underhill, ' Mysticism' पृ. ३८१ ) हें वर्णन वाचलें म्हणजे ' मिस्टिसिझम् ' चें साम्य संतांनीं त्याज्य म्हणून सांगितलेल्या योग-मार्गाशीं अधिक आहे असें वाटूं लागतें. ज्ञानेश्वरींत या मार्गास हा नित्य नवा अग्निप्रवेशच होय असें म्हटलें आहे.[१२] या उलट भागवतधर्माचा मार्ग सुलभ, सोपा, पावलोंपावलीं देवाचा सांभाळ प्रत्ययास येणारा कसा आहे, हें संतांनीं उच्च रवानें

---

१०. उदा०— प्रा. गं. बा. सरदार : ' संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति ' पृ. १०६

११. ' जया सोऽहंभाव अटकु । मोक्षसुखालागोनी रंकु । तयाचे दिठीचा झणे कळंकु । लागेल तुझिया प्रेमा ॥ '–( ज्ञानेश्वरी ). ' झणी मुक्तिपद देसी पांडुरंगा । मग या संतसंगा कोठें पाहूं ॥ ' —( नामदेव-गाथा ) १३२४. ' मज थोर भ्रम होता चित्तीं । गोड असेल जीवन्मुक्ति । तेथ न देखे तुझी भक्ति । कोरडी मुक्ति मज नलगे ॥ '—( एकनाथी भागवत, अ. २९.७१६ )—' मोक्षपदें तुच्छ केलीं या कारणें । आम्हा जन्म घेणें युगायुगीं ॥ विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुढत-पुढती आस सेवावी हे ॥ '—( तुकाराम-गाथा २१२० )

१२. किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेशु नीचनवा । भातारेंवीण करावा । तो हा योगु ॥– ज्ञा.१२-६६








घोषित केलें आहे.[१३] प्रा. रा. द. रानडे यांनीं महाराष्ट्रीय संतांच्या भक्तिमार्गास Mysticism हें नांव देऊन त्याच्या चौकटींत संतांचे भक्ति-विषयक अनुभव बसविण्याचा प्रयत्न केला आहे. तुकोबांच्या भक्तिमय जीवनक्रमाकडे त्यांनीं याच दृष्टीनें पाहिलें आहे. यामुळें त्यांनीं त्यांची तुलना सूसो नामक जर्मन साधूशीं केली आहे. या साधूच्या आयुष्यांत काळोखी रात्र १५/१६ वर्षें होती. हीं वर्षें त्यानें स्वतःच्या देहदंडनांत घालविलीं व 'मग' आपला देह शुद्ध झाला असें त्यास वाटलें. डीन इंगनें त्याचें वर्णन करतांना म्हटलें कीं :

" 'No cross, no crown' is the law of life, which Suso accepts in all the severity of its literal meaning ...After sixteen years of cruel austerities he felt that his 'refractory body' was finally tamed."[१४]

याच सूसोनें आपल्या छातीवर इंचभर खोल जखमा करून घेऊन खिस्ताचें नांव कोरलेलें होतें. अशा देहदंडन करणाऱ्या साधूची तुलना " न लगे दंडण मुंडण तें कांहीं । साधनाची नाहीं आटाआटी ॥ " " कासया उदास होऊं देहावरी । अमृतसागरीं बुडोनिया ॥ " ('तुकाराम-गाथा,' २५८०;७८१ ) असें म्हणणाऱ्या तुकोबांशीं करतां येत नाहीं. सूसोच्या आत्मचरित्रांत त्याच्या भावनांच्या उद्रेकाशीं तुकोबांच्या अभंगांतील भावनोद्रेकाशीं असलेल्या वरवरच्या साम्यावरून ही तुलना केली गेली आहे.

तुकोबांच्या अभंगांत करुणापर अभंग हे अतिशय गोड अभंग आहेत. या करुणापर अभंगांचा अर्थ 'नैराश्यात्मक तळमळ' असा प्रा. रानडे यांनीं केला आहे व त्यावरूनच ती 'पहाटें-पूर्वीची काळोखी रात्र' असावी असा तर्क केला आहे. परंतु या करुणापर अभंगांना भक्तजीवनांत एक विशेष स्थान आहे. या तळमळीस एक विशेष अर्थ आहे. ही करुणा व तळमळ ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ या सर्व संतांच्या अभंगांत प्रगट झालेली आहे. तुकोबांच्या अभंगांत तर ती प्रामुख्यानें पाझरली आहे. देवाची करुणा भाकणें ही नैराश्यात्मक अवस्था नसून ती देवाच्या प्रेम-स्वरूपाची अत्यंत गोड अनुभूति आहे. ती संतांनीं स्वतः सेवन केली व इतरांनाहि तिचें अमृतपान घडविलें आहे. धरणेकरी ब्राह्मणांस ज्ञानेश्वरांनीं दृष्टान्त देऊन तुकोबांकडे पाठविलें तेव्हां त्यांस तुकोबांनीं " देवास आळवीत जा, ग्रंथांच्या भरीस पडूं नको " असें सांगितलें ( तु. गा. ५२६ ). देवास आळविण्याचा भक्तिरसाचा परमोत्कर्ष त्यांनीं एका अभंगांत वर्णिला व म्हटलें कीं, " देवा, तुला करुणावचनांनीं आळविल्याखेरीज मला दुसरें कांहीं गोड लागत नाहीं...आतां तूं मला भेटला नाहींस तरी तुझी भेट मला घडत आहे. माझ्या अंतःकरणांत अखंड असा करुणानिर्झर वाहत आहे."–( 'तुकाराम-गाथा' ७२३ ). देवास आळवितांना सद्गदित कंठ होऊन हृदयांत प्रेम-कल्लोळ उचंबळणें ही देवाची भेटच होय. आळवणी जीवाची व त्यांत सप्रेम सद्गदता ही देवाची देणगी होय ( 'तुकाराम-गाथा' २२४६ ). प्रेमकल्लोळ हेंच देवाचें मूलस्वरूप होय ( 'तुकाराम-गाथा.' ५१७ ) व त्या स्वरूपाची अनुभूति म्हणजे भक्तीचा प्रत्यय होय.

---

१३. भवाब्धि तरावया भजनभावें । महानाव देवें निर्माण केली ॥ ...येथ पोहण्यावीण तरणें । प्रयासेवीण प्राप्ति घेणें ॥... माता देखोनि प्रेमभावें । बाळक डोळे झांकूनि धावे । ते धावे सवे झेपावे । अतिसद्भावें निजमाता ॥... तैसा सप्रेम भजे जो भक्तु । त्या भजनासवे भगवंतु । भुलला चाले स्वानंद-युक्तु । स्वयें संभाळितु पदोपदीं ॥... कर्म करूं पावे प्रमादु । तंव प्रमादीं प्रगटे गोविंदु ॥

—एकनाथी भागवत अ. २

१४. W. R. Inge—'Christian Mysticism' (पृ. १७२ ). सूसोनें करून घेतलेल्या अंगावर शहारे आणणाऱ्या शरीराच्या हालाच्या वर्णनाकरितां—W. James : 'Varieties of Religious Experience' ( पृ. ३०७–३०९ )–पाहा.







प्रा. रानडे यांनीं स्वतः, साक्षात् अनुभवाचा गाभा म्हणजे अवांतर गोष्टी नसून देवाचें नितान्त प्रेमच होय, असें म्हटलें आहे.[१५] परंतु या अवांतर गोष्टीच्या विशिष्ट सांच्यांतून जीवन गेलेंच पाहिजे असा त्यांच्या प्रतिपादनाचा रोख असल्यामुळें, तुकोबांच्या आध्यात्मिक विकासाचा क्रम त्यांनीं विशिष्ट तऱ्हेनें लावला आहे. वास्तविक ज्या अभंगांच्या आधारें त्यांनीं 'काळोखी रात्री'चें दिग्दर्शन केलें आहे ते अभंग म्हणजे तुकोबांच्या जीवनांत भक्तिरसाच्या ज्या विविध रंगांच्या ऊर्मी उमटत होत्या त्यांचें दर्शनच होय. ते कधीं देवावर रागावतात, कधीं रुसतात, कधीं 'कारे भेटत नाहींस?' म्हणून आक्रोश करतात, कधीं खेळकरपणें विनोद करतात, तर कधीं 'तूं माझ्यासमोर दंडवत् घाल' म्हणतात. या सर्व गोष्टींत एकच अनुभूति आहे. देवाचें प्रेमस्वरूप ओळखून मूल जसें आईवर कधीं रुसतें, कधीं रागावते, कधीं लडिवाळपणा करतें, पण सर्व खेळ आईच्या अंगावरच, त्याप्रमाणें देवाच्या प्रेमतनूवर या सर्व रूपानें तुकोबा खेळत आहेत. "हांसूं रुसूं खेळूं वाढवूं आवडी। अविट ते गोडी अंतरींची ॥" असें म्हणत सर्वांगांनीं देवास आलिंगन देत आहेत. हा त्यांच्या भक्तिरसाचा परिपाकच होय.

### प्रसादानंतरची प्रासादिक अभंगवाणी

तुकोबांच्या पारमार्थिक जीवनांतील भूमिकांचें वर्गीकरण करणाऱ्या प्रमुख तीन मतांतील मध्यवर्ती कल्पनांच्या विश्लेषणावरून हीं तिन्ही वर्गीकरणें तुकोबांच्या भक्तिमय जीवनास आपल्या कक्षेंत सामावूं शकत नाहींत हें दिसून येईल. तुकोबांच्या जीवनांत गूढता नसून, तें स्वच्छ व खेळकर झऱ्याप्रमाणें वाहत आहे. मध्यें कांहीं बंधारे आल्यास त्याचा प्रचंड प्रपात बनून तें अधिक उल्हासानें उफाळत आहे. तुकोबा जन्मास येण्यापूर्वी आठ पिढ्या अगोदर त्यांच्या घरांत पांडुरंगाची भक्ति चालत आली होती. त्या वातावरणांतच ते जन्मले, लहानाचे थोर झाले. बालवयांतच प्रपंच गळ्यांत पडला. पित्याची आज्ञा शिरसावंद्य समजून उद्योगधंदा नेकीनें चालविला. पुढें काळ उलटला तरी नेटानें प्रपंच करण्यास कंबर कसली. पण विपरीत काळानें त्यांची वाताहत झाली. त्या वाताहतीनें अंतःकरणास यातना झाल्या. पण धीर न सोडतां कुलदेवतेच्या पायींच दृढ मिठी मारली. तिच्या नामस्मरणाची कांस धरली. नामस्मरणानेंच संसारताप शीतळ होऊन त्यांची काया शीतळ झाली.[१६] त्यांनीं प्रपंचाचा त्याग केला नाहीं. ज्यानें प्रपंच हातांतून हिसकविला त्या देवावरच सर्व भार सोंपविला. तोच सांभाळणारा असून त्याचें त्यासच सर्व करणें भाग आहे असा बोधाचा निर्धार बांधून, सर्व प्रकारची भीति सोडली. संसार भंगला तरी देवाचें भंगलेलें देऊळ दुरुस्त केलें. देवासमोर देवाच्याच कृपाळुपणाची कहाणी कीर्तनद्वारां सुरू केली. ज्ञानदेव, एकनाथ, नामदेव या संतश्रेष्ठांच्या वचनांवर विश्वास ठेवून त्यांचें आदरानें पठण केलें. त्या पठणानें जीवनास ओलावा मिळूं लागला. त्या ओलाव्यानें नामसंकीर्तनाची चटक वाढली. संतचरणांविषयीं आदर व प्रीति द्विगुणित झाली. इतरांचें न ऐकतां संतवचनेंच मनास पटलीं व तींच प्रमाण मानलीं. संतप्रीतीनें डवरलेल्या मनास सत्यासत्याचें ग्वाही केलें. नामचरणाच्या गोडीनें जीवन रंगवीत असतां आपणांस श्रीगुरूचा आधार असावा व भेट व्हावी असें त्यांना वाटलें, तेव्हां गुरूची भेट स्वप्नांत झाली. त्यांनीं दुसरेंतिसरें कांहीं न सांगतां त्यांचा आवडता मंत्र 'रामकृष्ण हरी'च गोडीनें उच्चारावयास सांगितलें.[१७] पांडुरंगानेंच श्रीगुरूच्या रूपानें भेट दिली असें समजून नामस्मरणांत चित्त अधिक रंगलें. या रंगलेल्या अवस्थेंतच "नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें। सवें पांडुरंगें येउनिया ॥

15. "What constitutes the essence of mystic realization is not these mystical phenomena themselves, but an unfaltering, unbending, unending love of god."—'Mysticism in Maharashtra'-Preface.

१६. सीण झाला मज संसारसंभ्रमें। शीतळ या नामें झाली काया ॥ —तु. गा. ३५६

१७. आवडीचा मंत्र सांगितला सोपा। जेणे नोहे गुंफा कोठें कांहीं ॥ —तु. गा. ४८७.








सांगितलें काम करावें त्वरित । वाउगें निमित्त बोलों नको ॥ " हा प्रसंग घडला. तुकोबांच्या 'पोटीं प्रसाद' राहिला. ( तु. गा. ४९१ ) या प्रसादाची स्फूर्ति अभंगवाणीरूपानें बाहेर पडली. तुकोबांची सर्व अभंगवाणी ही देवाच्या भेटीनंतरची प्रासादिक अशी आहे ही गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

तुकोबांची प्रासादिक वाणीच कीर्तनरूपानें स्रवूं लागली. भागवतधर्मांत कीर्तनास एक विशिष्ट स्थान आहे. कीर्तन म्हणजे हरिदासाची लोकरंजनात्मक कहाणी नव्हे अगर उपदेशात्मक औषधगुटयांची खैरात नव्हे. तो एक श्रेष्ठ प्रेमानुभव आहे.[१८] त्यांत सर्वांगी प्रेमानुभूतीचा संचार होऊन अंगसंगीं असणारा परमात्मा सप्रेम रूपानें सगुण होऊन श्रोत्यावक्त्यांस एकाच श्रीरंगाच्या रंगानें रंगवीत असतो.[१९]

" आरंभीं कीर्तन करी एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥ " असें तुकोबांनीं म्हटलें आहे. मनोवृत्तींशीं त्यांना कांहीं काळ झगडावें लागलें. परंतु हळूहळू सर्व वृत्ती देवाशींच रमूं लागल्या. " जें जें का निमिख । देखेल माझें सुख । तें तुळे अरोचक । विषयी घेईल ॥" ( ज्ञा. १२.१०६ ) या न्यायानें मनास भगवत्प्रेमाची ज्या क्षणीं रुचि लागली तो क्षणच पुढील अनेक क्षणांचा उत्पादक बनूं लागला. हरिकथारूप माउलीच्या उदरींच तुकोबांचा जणूं काय पुनर्जन्म झाला व " तिनेंच वाढवून माझें पालनपोषण केलें. हें माझें गौरवाचें भाषण नसून प्रत्यक्ष अनुभवच आहे " असें ते म्हणतात. ('तुकाराम-गाथा', २४३८). या कीर्तनरसांतच तुकोबांच्या जीवनाची परिणति होऊन त्यांची जीवनगंगा परमात्मप्रेमसागराच्या हृदयावर " मिळोनी मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें ॥ " ( ज्ञा. १३.६०८ ) " तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मि एकमय " ( तुकाराम गाथा ४०१६ ) या उक्तींप्रमाणें विहरूं लागली व आपल्या संवगड्यांनाहि विहार करण्यास शिकवूं लागली. भक्तांचें प्रतिवर्षीं भरणारें स्नेहसंमेलन अशी जी पंढरीची वारी ती त्यांनीं नियमानें चालविली, ज्ञानेशादि संतांनीं उभारलेल्या या स्नेहसंघटनेस जीवाभावानें साहाय्य केलें. " या रे या रे लहानथोर । याति भलते नारीनर । करावा विचार । नलगे चिंता कोणासी ॥ ", " एकमेकां साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ " असें सादावून, स्वतःच्या जीवनाची भक्तिमय परिणतता अनुभविली व संगतींत आलेल्या समाजांतहि तिची अनुभूति जागृत करून " तुका झालासे कळस । भजन करा सावकाश " ही उक्ति सार्थ केली. तुकोबांचें आध्यात्मिक जीवन म्हणजे भक्तिबीजांकुरास बुंधा, फांद्या, पानें फुटून आलेला फळाफुलांचा बहरच होय असें डॉ. ॲबट म्हणतात तें अगदीं यथार्थ आहे.[२०]

---

१८. कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥—तु. गा. २४२१.

१९. नित्य नवा कीर्तनीं कैसा वोढवला रंग । श्रोता आणि वक्ता स्वयें झाला श्रीरंग ॥

—एकनाथ-गाथा अ. १४/७७ ( आवटे-प्रत )

20. " Tuka's growth was like the growth of a tree, from seed to full stature, on some retired spot, un-assisted except by the very laws of his own being. "— A. E. Abbot—' Tukaram '--Preface, page X.

---

## केन्द्रीकरण

केन्द्रीकरण म्हणजे ( apoplexy at the centre ) केन्द्राच्या ठिकाणीं मेंदूची विकृति आणि ( paralysis at the circumference ) केन्द्राच्या बाहेर परिघाच्या ठिकाणीं बधिरपणा आणि निश्चेष्टता. प्रत्येक राजकारणी पुरुषानें हें लक्षांत ठेवावें कीं राजकारणांत या ( apoplexy ला ) मेंदूच्या झटक्यालाच 'क्रान्ति' म्हणतात ! —लार्ड ॲक्टन.

स्वानुभवावरून काढलेले कांहीं निष्कर्ष : प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# खेडेगांवांतील विधायक कार्य

या लेखाचें स्वरूप मर्यादित आहे. त्यांतील विधानांविषयीं माझा कोणताहि आग्रह नाहीं. परंतु आजच्या विधायक कार्यप्रवृत्तीच्या काळांत आपला मर्यादित स्वरूपाचा अनुभवहि पुढें मांडला तर तें अगदींच अनाठायीं होणार नाहीं, या अपेक्षेनें कांहीं विचार पुढें मांडीत आहे.

ज्या अनुभवावर हा लेख आधारलेला आहे त्याचें स्वरूप असें : गेल्या उन्हाळ्याच्या सुट्टींत पुण्यांतील एका विद्यार्थि-संघटनेच्या वतीनें मी व माझे कांहीं विद्यार्थिमित्र पुण्याजवळील खानापूर या खेडेगांवांत जाऊन राहिलों. खेडेगांवाची पाहणी करावी व जमेल ती समाज-सेवा करण्याचा प्रयत्न करावा असा दुहेरी हेतु मनांत ठेवून आम्ही तेथें गेलों होतों. खानापूरचे सुप्रसिद्ध समाजसेवक डॉ. गोपाळराव मोडक यांनीं आम्हांला सर्वतोपरी साहाय्य केलें. त्या मानानें भरीव असें कांहींच कार्य आमच्या हातून होऊं शकलें नाहीं हीच आम्हांला शेवटीं रुखरुख लागून राहिली व अजूनहि आहे. परंतु खेडेगांवांतील एकूण परिस्थिती-चें जवळून सूक्ष्म असें निरीक्षण या कालखंडांत आम्हांला पुष्कळच करतां आलें. स्त्रियांचा वर्ग, प्रौढांचा वर्ग, विद्यार्थ्यांचा वर्ग अशा चालविलेल्या शैक्षणिक वर्गांतून त्या त्या गटाचा संबंध येत असे. आमची राहावयाची जागाहि गांवांतील लोकांच्या उठाबसावयाच्या मुख्य जागेशेजारींच होती. आमची जेवावयाची सोय निरनिराळ्या खेडुतांच्या घरीं करण्यांत आली होती. खेडुतांचें स्नेहशील अगत्य मिळालें. घरगुती निकटचा संबंधहि आला. डॉ. मोडक आज एक तप खानापुरांत राहून समाजसेवेचें कार्य अविश्रान्त करीत आहेत. त्यांच्याशीं झालेल्या अनेक चर्चांतूनहि एकूण परिस्थितीवर बराच प्रकाश पडला. डॉ. मोडक व मीं अशा दोघांनीं, खडकवासला-धरणाच्या आसपासच्या खेड्यांतून व आंतील डोंगराळ मावळ मुलुखांतून सुमारें १०० मैलांचा प्रवास करून, वीस खेड्यांची प्रत्यक्ष पाहणी केली. डॉ. मोडक यांच्याविषयीं या भागांतील लोकांच्या मनांत अत्यंत आदर असल्या-मुळें हें काम सुलभ झालें. आम्ही येणार असल्याची वर्दी पुढें पाठविण्यांत येई. आम्ही पोहोंचल्यानंतर गांवांतील प्रमुख मंडळी व कांहीं गांवकरी अशी ३०।४० माणसें जमून एक बैठक होई. त्या बैठकींत खेडेगांवांतील परिस्थितीविषयीं नेमकी परंतु मनमोकळेपणाची चर्चा होत असे. आमचा हेतु केवळ अभ्यासाचा आहे, आम्हांला सरकारला कांहीं रिपोर्ट करावयाचा नाहीं किंवा कोणती सरकारी वा अन्य मदतहि आमच्याकडून मिळण्यासारखी नाहीं हें आम्ही सुरवातीलाच स्पष्ट करीत असूं. गांवकरी बिचकत-बिचकत सुरवात करीत, परंतु पुढें मोकळे-पणानें बोलूं लागत. अशा रीतीनें तीन-चार तास चर्चा झाल्यानंतर भोजनादि इतर कार्यक्रम होत व गांवकरी आमच्या पुढील मुक्कामापर्यंत कोणी तरी वाटाड्या बरोबर देण्याची तजवीज करून आमचा निरोप घेत. खानापूरच्या वास्तव्यानें व या प्रवासानें मनाचीं व हृदयाचींहि कांहीं नवीं कवाडें उघडलीं गेलीं आहेत असें वाटल्याखेरीज राहिलें नाहीं.

खानापूरचा व पुण्याचा प्रत्यहींचा संबंध आहे. दररोज कांहीं दूधवाले पुण्याला येऊन दूध घालतात. लॉंच व मोटार यांच्या सोयीमुळें धरणाजवळच्या इतर गांवांचाहि पुण्याशीं संबंध राहूं शकतो. आंत आडबाजूला असणाऱ्या खेड्यांचा वाहतुकीच्या साधनांच्या अभावीं बाहेरच्या जगाशीं निकटचा संबंध राहत नाहीं. परंतु कांहीं खेड्यांतील बरीच मंडळी मुंबई-पुण्यांतून नोकरीवर आहेत आणि त्यांच्याकडून शहराचा खेड्यांशीं संबंध आल्याखेरीज राहत नाहीं. भाजीपाला, दूध, अंडीं यांच्या विक्रीसाठीं जवळचीं शहरें उपयोगी पडतात. शहरांत प्रत्यक्ष जाऊन-येऊन असणाऱ्या मंडळींना शहरी संवयी जडतात. क्षय, गुप्तरोग अशा रोगांचा प्रसारहि या लोकांच्या मार्फतच नंतर खेड्यांत सुरू होतो. परंतु खेडेगांवांतील एकजिनसी जडतेवर या शहरी संबंधाचा कांहींहि परिणाम होऊं शकत नाहीं. संकुचित भेद, जीर्ण रूढी यांचें राज्य








# खेडेगांवांतील विधायक कार्य

अप्रतिहत तसेंच चालू राहतें. एखादी शहरी सुधारणा गांवांत आली कीं निरुद्योगीपणा, आळस हे अधिकच वाढतात. गावांत गिरणी आली कीं गरीबांच्या घरचेंहि दळण तेथें येऊं लागतें. बायका चोरून पैसे सांठवितात आणि दळण गिरणींत पाठवितात. एकेका गिरणीचें मासिक उत्पन्न ४००-५०० रुपयांपर्यंत जातें. आजूबाजूच्या खेड्यांतूनहि दळणें येतात. याचा अर्थ वार्षिक पांच हजार रुपयांचा अशा रीतीनें व्यय होतो. नवविचार किंवा नवकृति या दृष्टीनें आपलीं खेडीं किती सुस्त आहेत याची कल्पना प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज येऊं शकत नाहीं. आज भारत जागृत आहे असें आपण म्हणतों तर ही स्थिति, मग ज्या वेळीं भारत हा एक 'थंड गोळा' होऊन पडलेला होता त्या वेळची परिस्थिति कशी असेल? कदाचित् आज आहे अशीच असेल? आज दोन हजार वर्षें ही परिस्थिति अशीच राहिली आहे. आपल्या कोणत्याहि खेड्याकडे पाहिलें कीं, शतकाशतकांची झोप त्याच्या डोळ्यांवर रेंगाळत असलेली दिसते. भारतांत जागृति झाली असें आपण म्हणतों ती मुख्यत्वेंकरून राजकीय जागृति होती. तीहि विशेष अशा स्वरूपांत शहरांतूनच दिसून आली व नंतर तिच्या लाटा खेड्यापाड्यांतून महात्माजींनीं पोहोंचविल्या. परंतु सामाजिक वा विधायक आर्थिक परिवर्तनाच्या दृष्टीनें आपलीं खेडीं आज अजूनहि पूर्वींइतकींच मख्ख आहेत!

कोणतेंहि परिवर्तन आपण होऊन करावयाचेंच नाहीं असा आपल्या खेडेगांवांचा एक अलिखित निश्चयच आहे. त्यांना समजुतीच्या गोष्टी सांगितल्या तर त्या पटतील. कांहीं वेळां सौजन्य म्हणून न पटतांहि पटल्याप्रमाणें माना डोलवावयास ते कमी करणार नाहींत. परंतु कित्येक वेळां सुधारणांची तरफदारी तेच इतक्या सुबकपणें करतात कीं, निदान त्यांना या सर्व गोष्टी समजतात याविषयीं तरी शंका राहूं नये. सहकारी शेतीपासून संततिनियमनापर्यंत कोणताहि विषय काढा, ते बोलतांना तरी समजूतदारपणा दाखविल्याखेरीज राहणार नाहींत. परंतु साध्या गोष्टींतहि आपण होऊन सहकारानें एकत्र येऊन कार्य करणार नाहींत. एका गांवांत गांवांतील प्रत्येक माणूस नारूनें आजारी पडला होता. त्या गांवांत असेतोंपर्यंत तेथें पाणी तोंडांत घ्यावयाचें धैर्य आम्हांला झालें नाहीं. चार महिन्यांची मजुरी बुडाली होती. घरें शाकारण्यासाठींहि शेजारच्या गांवाचे सगेसोयरे बोलावले होते. परंतु ही आपत्ति केवळ आळशी जडतेमुळें गांवावर आली होती. गांवांत एकच विहीर होती. ती दुरुस्त करून नीट ठेवण्यासाठीं सरकारनें पैसे दिले होते. परंतु चार दिवसांच्या सहकारी श्रमाला कोणी पुढें झाले नाहींत. सरकारी देणगी दोन वर्षांनीं परत करण्यांत आली. चार दिवसांच्या आळसासाठीं चार महिने निकामी पडावें लागलें. त्यांना विचारतांच त्यांनीं चूक कबूल केली. परंतु याचा अर्थ नंतर त्यांची वागणूक यापुढें बदलेल असा मात्र नव्हे. कोणतीहि गोष्ट पटते तर मग ती कां करीत नाहीं असें विचारलें कीं, 'नाहीं, तें कायदा केला तरच होईल' असें सांगून सर्व कांहीं सरकारवर सोंपवून ते मोकळे होतात. परंतु याहि बाबतींत एक ध्यानांत घेण्यासारखी महत्त्वाची गोष्ट आहे. प्रत्येक वेगवेगळ्या व्यक्तीला कायदा, पोलीस, अधिकारी यांचा धाक वाटत असतो, परंतु एकूण खेडेगांवाच्या खेडुतविभागाच्या सामुदायिक जाणिवेवर यांपैकीं कशाचाच विशेष धाक दिसत नाहीं. अस्पृश्यतानिवारण, शारदा-कायदा, सक्तीचें प्राथमिक शिक्षण, दारूबंदी, लेव्ही, धान्याचा काळा बाजार, जंगलांतील झाडांची तोड, धरणांतील पाण्याचा वापर यांविषयींचे कायदे पुष्कळसे कागदोपत्रींच राहतात. अशा वेळीं कायदा करणें योग्य कीं चूक हा विवादाचा प्रश्न होऊं शकेल. केलेला कायदा आपण धुडकावूं शकतों ही सामुदायिक जाणीव सरकारच्या इभ्रतीच्या दृष्टीनें विशेषशी चांगली नाहीं. परंतु या बाबतींत जुलमी कायदे व समाजहितैषी कायदे असा फरक करावा, असें मला वाटतें. समाजहितैषी कायदे सुरुवातीला पूर्णपणें अंमलांत आणतां आले नाहींत तरी लोकशिक्षणाचें कार्य त्यांच्यामुळें हळूहळू होत असतें व समाजाला नवीन हितावह रूढीची संवय होत जाते. हें कार्यहि फारच हळूहळू होत असतें, एवढाच फार तर त्याच्यावर आक्षेप घेतां येईल.








खडकवासला-धरणाच्या कांठचीं एकदोन खेडीं आर्थिक दृष्ट्या कांहींशीं बरीं आहेत. उन्हाळ्यांत कांठाचें पाणी ओसरलें कीं खालच्या गाळाच्या जमिनीवर त्यांना भाजीपाला, धान्यादिकांचें उत्तम 'माळवें' काढतां येतें. परंतु याखेरीज इतर सर्व खेडीं मात्र अगदीं दरिद्री आहेत. खानापूरहि आर्थिक दृष्ट्या दारिद्रीच. परंतु खानापूरला दारिद्र्याची परिसीमा समजावें, तर आंत मावळ-खोऱ्याकडे आपण जाऊं लागलों कीं, दारिद्र्याचें अधिकाधिक निकृष्ट दर्शन आपल्याला होऊं लागतें. सिंदबादला एका दरीपेक्षां पलीकडच्या दरींत अधिक मौल्यवान् रत्नें सांपडत! त्याच्या उलट, या विभागांत डोंगराची एकेक पुडी उलगडली कीं, अधिकाधिक दारिद्र्याचें दर्शन होत जातें. खानापूरचा शेतकरी मावळांतील शेतकऱ्याच्या कष्टांची कींव करतो, मावळांतील शेतकरी कडेकपाऱ्यांतून उढा, बांबू तोडून वाहून आणणाऱ्या लोकांची कींव करतो आणि यांतच त्यांना स्वतःची परिस्थिति अधिक चांगली असण्याचें समाधान लाभत असावें. नाहीं तर कुणीं कुणाची कींव करावी अशी सर्वांची परिस्थिति आहे. तुटपुंज्या भातशेतीचें उत्पन्न, पावसाळ्यांत स्वतःपुरता भाजीपाला, अगदी थोडें दूध, पिण्याच्या पाण्याची टंचाई (धरणाशेजारील गांवांनाहि पाणी अर्धा-पाऊण मैल अंतर चढून वर आणावें लागतें!), जोडधंदा जवळजवळ कोणताच नाहीं, अशा दुर्भिक्षाच्या अवस्थेंत हीं सारीं गांवें आहेत. खानापूरला बैलगाडीचा जोडधंदा आहे, पण तोहि आतां बसत आलेला आहे. परंतु या परिस्थितींत कपाळाला हात लावून बसण्याखेरीज दुसरें कांहीं सुचत नाहीं आणि कोणीं सुचविलें तर तसें करणें त्याला रुचत नाहीं. चराचे संडास, कंपोस्टचे खड्डे, शेती-सुधारणायोजना, लहान लहान जोडधंदे, यांविषयीं त्याला उत्साह दिसत नाहीं. मग कांहीं कार्य झालेंच तर तें सरकारी अधिकाऱ्यांच्या मार्फत मंत्र्यांच्या नजरेपुरतें होतें. सर्वच गांवाला नवीन प्रेरणा मिळाली आहे असें घडत नाहीं.

खेडेगांवांत नवीन कार्य हातीं घेतांना कांहीं पथ्यें सांभाळणें आवश्यक आहे. कोणतीहि सुधारणा सुचवावयाची ती विचारपूर्वक सुचविण्यांत आली पाहिजे. नवीन कल्पना कोणत्याहि कारणानें फसली कीं शेतकरी अधिकच बिचकतो व जुन्या-विषयींचा त्याचा आग्रह दुप्पट वाढतो. त्याचप्रमाणें नवीन प्रयोग फसले तर त्यांची आर्थिक तोशीस शेतकऱ्याला कोणत्याहि प्रकारें लागतां कामा नये. हेंहि सांभाळणें व्यवहारांत मोठें कठिण आहे. कारण प्रयोग न करतांहि नुकसान दाखवून भरपाई मागण्याची वृत्ति साधाभोळा समजला जाणाऱ्या शेतकऱ्यांतहि आहेच. याशिवाय प्रयोगापासून होणारा आर्थिक फायदा स्पष्टपणें नजरेस येण्यासारखा असला पाहिजे. तरच नवीन गोष्टी-विषयीं शेतकऱ्याला अगत्य वाटूं लागेल. या सर्व गोष्टींत मार्गदर्शक म्हणून काम करणाऱ्या व्यक्तींच्या अंगच्या गुणांवर तर पुष्कळसें यशापयश अवलंबून राहील. समाजविकासयोजनां-(कम्युनिटि प्रोजेक्ट्स)-च्या अधिकारी वर्गाला उद्देशून केलेल्या भाषणांत पं. जवाहरलाल नेहरूंनीं सांगितल्याप्रमाणें, ध्येयवादी प्रचारकाच्या हातूनच हें काम तडीस जाऊं शकेल; केवळ पगारी अधिकारी म्हणून काम करणाऱ्यांच्याकडून येथें कार्य होऊं शकत नाहीं असाच अनुभव आहे. प्रेरणा आहे, परंतु तंत्र नाहीं, अशा ठिकाणीं पगारी तंत्रज्ञ पुरेसा असतो; परंतु प्रेरणाच निर्माण करावयाची असेल त्या ठिकाणीं केवळ पैशानें कामें पुरीं होऊं शकत नाहींत. परंतु ही आवश्यक नवप्रेरणा आज कोण निर्माण करीत आहे?

खेड्यांतील कामाला चालना देण्याच्या दृष्टीनें खेड्यांतील रहिवासी लोक व बाहेरील कार्यकर्ते असे दोन गट आपल्याला करतां येतील. नवदृष्टीचा समाजसेवक कार्यकर्ता खेडुतांतूनच निर्माण झालेला असला तर तें अर्थातच सर्वांत अधिक इष्ट होय. परंतु सहसा तसें आढळत नाहीं. रहिवासी लोकांपैकीं स्त्रीवर्ग व अस्पृश्यसमाज यांना इतकें दडपून ठेवण्यांत आलेलें आहे कीं, समाजाच्या पुनर्रचनेच्या दृष्टीनें नजीकच्या भविष्यांत तरी त्यांना कांहीं उपयोगी सहकार्य इतरांना देतां येईल असें दिसत नाहीं. अस्पृश्यांच्या अंतरंगांत कडवटपणाची आग धुमसतांना साहजिकपणेंच दिसते. त्यांच्या भजनी

मंडळींतहि भीमदेवाचीं प्रचारकी भजनें म्हणण्यांत येतात. केवळ कायद्यानें खेडेगांवांतुन अस्पृश्यता सहजासहजीं नाहींशी होईल अशी अपेक्षा आपण बाळगू नये. कार्याच्या दृष्टीनें गांवांतील प्रमुख जमातींतील पुरुषवर्ग व त्यांतीलहि सधनपैकीं पुढारी-वर्ग हेच महत्त्वाचे आहेत. आज तरी मुख्य सूत्रें या पुढारीवर्गाच्याच हातीं असतात. ते खालील लोकांच्यावर अधिकार गाजवितात व अधिकारी वर्गाशीं गोडीगुलाबीनें राहतात. या लोकांच्या साहाय्याशिवाय आपलीं नित्यनैमित्तिक कामें सुरळीतपणें पार पडणें अशक्य आहे, हें अधिकारीहि आपल्या मनाशीं ओळखून असतात. इतर लोकांना आपल्यावर होणाऱ्या अन्यायाची जाणीव असते, परंतु संघटना नसते. आपली बाजू कुठें मांडावी, कशी मांडावी याचें त्यांना ज्ञान नसतें. त्यांची सतत पाठ राखणारेहि कोणी नसतात. मधला आपमतलबी गुंडांचा गट बाजूला करुन जनतेपर्यंत कसें पोहोंचतां येईल हाहि एक बिकटच प्रश्न आहे.

सुधारणेचें काम सातत्यानें चालावयाचें असेल तर गांवकरी लोकांतूनच कार्यकर्ते निर्माण व्हावयास पाहिजेत. निरनिराळ्या व्यावहारिक उपयोगाच्या विषयांचें नीट शिक्षण मिळालेले कांहीं लोक गांवोगांव पाहिजेत. सरकारनें या दृष्टीनें कांहीं प्रयत्नहि करुन पाहिले आहेत. शिष्यवृत्त्या व इतर मदत देऊं करण्यांत येते. परंतु परत जडताच आड येते. शिक्षणासाठीं एकदोन वर्षें बाहेर जाण्यासच लोक तयार होत नाहींत. शिक्षणाविषयीं तितकासा विश्वासहि वाटत नाहीं. किमान मराठी सात इयत्तां-इतकें शिक्षण असावें ही अटहि अनेकांच्या बाबतींत निषेधकच ठरते. साक्षरतेपेक्षां व्यापक लोकशिक्षण व तात्त्विक ज्ञानापेक्षां व्यावहारिक विज्ञान यां-वर भर देऊनच खेड्यांतील शिक्षणक्रमाची आंखणी करावयास पाहिजे. त्यांच्या दैनंदिन व्यवहारापुरतें परंपरागत सामान्य ज्ञान सोडलें तर इतर बाबतींतील त्यांचें ज्ञान जवळजवळ शून्य असतें. स्त्रियांच्या बाबतींत तर एकूण जगाची, परिस्थितीची त्यांना असलेली माहिती विलक्षण तोकडी असते. दुसरें महायुद्ध सुरु झाल्याचें सर्वांना माहीत होतें; परंतु दुसरें महायुद्ध संपलें, हें अनेक जणांना माहीत नव्हतें ! ( कदाचित् त्यांचें म्हणणेंच अधिक बरोबर असेल ! ) इंग्लंड, अमेरिका असे देश कुठें आहेत हें त्यांना ऐकूनहि माहीत नव्हतें. पुराणांतील कथांतीलहि चार-दोन प्रमुख पात्रें व प्रसंगच त्यांना माहीत असत. चांगल्या मध्यम स्थितींतील शेतकऱ्याच्या कुटुंबांतूनहि अशी परिस्थिति आढळून येई. या दृष्टीनें खेडेगांवांतील बाल, प्रौढ, वृद्ध व स्त्रिया यांच्या शिक्षणाविषयीं अद्याप पुष्कळच विचार होणें जरुर आहे. शहरी शिक्षणपद्धतीचें सहीसही अनुकरण आपण आतां खेडेगांवांतुन करीत नाहीं. परंतु तरीहि मुख्यत्वेंकरुन त्याच पद्धतीची छाप अद्यापीहि तेथें आढळून येते. खेडेगांवांतील परि-स्थितीशीं सुसंगत अशा नवशिक्षणांतूनच विधायक कार्याची प्राथमिक भूमिका आपल्याला तयार करतां येईल व त्यांतुन तयार झालेले लोकच पुढें पुढारी म्हणूनहि उपयोगी पडतील. यासंबंधांत खेडे-गांवांतील प्राथमिक शिक्षकाचें महत्त्व लक्षांत घेतलें पाहिजे व हेतुपुरस्सर तें वाढविलें पाहिजे. हा शिक्षक त्या विभागांतील रहिवासी असावा, आर्थिक विवंचना राहणार नाहीं असें वेतन त्याला मिळावें, विविध विषयांचें प्राथमिक ज्ञान ( उदा. वैद्यकी ) त्याला देण्यांत यावें, वार्षिक पंधरा दिवस एखाद्या शैक्षणिक शिबिरांत त्याच्या ज्ञानाला उजळा देण्यांत यावा व गांवांत त्याला मानाचा दर्जा राहील अशी एकूण परिस्थिति असावी. असे उत्साही शिक्षक आजहि मिळण्यासारखे आहेत.

बाहेरील कार्यकर्ते हे सरकारी अधिकारी, पगारी प्रचारक किंवा समाजसेवक अशा वर्गापैकीं असतात. ध्येयवादीपणें खेड्यांत रहिवासी होऊन विधायक कार्याला आपल्याला वाहून घेतलेल्या कार्यकर्त्यांचीं कांहीं उज्ज्वल उदाहरणें दिसतात; परंतु राष्ट्रांतील एकूण कार्याच्या व्यापाच्या मानानें ही संख्या अगदीं-च तोकडी आहे. या संख्येंत यापुढें झपाट्यानें वाढ होण्याची अपेक्षा धरावी अशी जागृत क्रांति-वृत्ति आज तरी राष्ट्रांत दिसत नाहीं. या सेवकांचें कार्य त्यागाचा व सेवेचा एक आदर्श म्हणून सदैवच उपयुक्त राहील. परंतु त्या कार्याच्या मर्यादाहि आपण विसरतां कामा नयेत. निरलस, निरपेक्ष सेवेमुळें जातिभेदाची धार बोथट होत असली








तरी जातिविद्वेषामुळें अनेक अडचणी कार्यकर्त्यांच्या मार्गांत उभ्या राहतात ही गोष्ट निश्चित आहे. खेडेगांवांतील लोकांचा विश्वास संपादन करणें ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे व त्यांना स्पष्टपणें उपयुक्त अशी एखादी सेवा करणाऱ्यालाच तसा विश्वास लवकर संपादन करतां येतो. शिक्षकाला देखील असा विश्वास संपादन करणें अवघड होतें; कारण, शिक्षणाचे फायदे बरेचसे अस्पष्ट व अप्रत्यक्ष असतात. वैद्यकव्यवसाय करणाऱ्यांना ही गोष्ट अधिक सुलभ होते; परंतु तेथेंहि लोक वाजवीपेक्षां अधिक त्यागाची अपेक्षा बाळगतातच. कीर्तनकाराला कांहींसें स्थान मिळूं शकेल. परंतु कीर्तनाचे विषय, गजर, भजनें, पूर्वरंग, उत्तररंग हे सांचेहि बरेचसे ठरल्यासारखे आहेत. त्यांत विशेष ढवळाढवळ करणें हेंहि सहसा लोकांना रुचत नाहीं. शिवाय फुकटेपणाची वृत्ति ही आपल्या समाजाच्या अंगांतच मुरलेली आहे. सेवकाच्या मोफत मिळणाऱ्या श्रमाचें मोल आपण तोंडदेखलें कौतुक करून देतों एवढेंच. त्या सेवेपासून इतरांना स्वावलंबनाची दीक्षा मिळाली व तदनंतर सेवेची गरज उरली नाहीं तरच ती सेवा सफल झाली असें म्हणतां येईल. आजचा सेवक हा ग्रामसुधारणेच्या कार्याची एक कुबडी झाला आहे. ही कुबडी काढून घेतली कीं ग्रामसुधारणा कोसळते. स्वतःची अशी शक्तीच तिच्या पायांत निर्माण होत नाहीं. याचें निदान झालें पाहिजे. सरकार मदत देतें, इतर उत्साही मंडळी पैसा देतात, समाजसेवक श्रम करतात आणि एखादें काम उभें होतें. पैसा व श्रम मिळाल्यानंतर एखादी शाळा, दवाखाना, विहीर, रस्ता, बांध या गोष्टी बांधून व्हाव्यात यांत नवल नाहीं. पैसा किंवा श्रम गांवकरी ज्या प्रमाणांत उभे करूं शकतील तेवढेंच त्या कार्याचें निरन्तर प्रगतीच्या दृष्टीनें खरें महत्त्व. याविषयींचे खरे आंकडे मांडण्याचें धैर्य आपण कधीं दाखविलें तर परिस्थितींतील निराशा जाणवून टोंचल्याखेरीज राहणार नाहीं. खेड्यांना उत्तेजन देण्याच्या दृष्टीनें लहानसहान कार्याचाहि उदोउदो होणें आवश्यक आहे ही गोष्ट खरी; परंतु यांत आपणहि आपली आत्मवंचना करून घेत नाहीं याविषयीं जागरूक असलें पाहिजे.

समाजसेवक मिळतील तेवढे हवेच आहेत. परंतु समाजसेवकांना उपजीविकेचीं व सेवेचीं अधिक साधनें उपलब्ध करून देऊन त्यांची कार्यक्षमता वाढविणें जरूर आहे. तसेंच, कांहीं समाजसेवक आपला संपूर्ण प्रश्न सोडवूं शकतील अशी भोळी आशा बाळगतां कामा नये. निरनिराळ्या खाजगी संस्थांनीं नेमलेल्या पगारी समाजसेवकांकडून तर फारच अल्प कार्य होऊं शकतें. पगार तुटपुंजा असतो. आणि ध्येयवादाचें वातावरण नसलें कीं, कमी पगारावर त्याच मामुली योग्यतेचीं, निरुत्साही, स्वयंकर्तृत्वाचा अभाव असलेलीं अशींच माणसें मिळतात. आंतरिक उत्कट ध्येयवाद व समाजसेवकाला व त्याच्या कुटुंबाला योग्य असें राहणीचें मान या दोन्ही गोष्टींची जरूरी आहे. दारिद्र्याचें व्रत घेतलेल्या सेवकालाहि कुटुंबीयांचे आजार, मुलांचें शालेय व उच्च शिक्षण याबाबतींत पैशाचा अभाव तीव्रपणें जाणवल्याखेरीज राहत नाहीं.

खेडेगांवांत आज सर्वजण केवळ वरवर प्रश्न हाताळून समाधान मानीत आहेत. सरकार कायदे करतें व आपलें कर्तव्य केल्याचा निःश्वास सोडतें. ते कायदे अंमलांत कां येत नाहींत याविषयीं क्वचितच विचार होतो. सरकारी अधिकारी नोकरी व बढती या दृष्टीनें आवश्यक असें दिखाऊ किमान काम करून बाजूला होतात. समाजसेवक धडपडतो, परंतु आपली धडपड निर्बळ आहे याची त्याला उत्तरोत्तर जाणीव होऊं लागते. नवचैतन्यानें भारलेली एखादी समर्थ संघटना उभी राहिली तरच खेडेगांवांतील विधायक क्रांतीचें कार्य पुरें होऊं शकेल. हें कार्य अत्यंत दुर्घट आहे. गांधीजींना या कार्याची तीव्र जाणीव होती. म्हणून त्यांनीं स्वातंत्र्यसंपादनाकरितां राजकीय कार्य करीत असतांनाच आपल्या रचनात्मक कार्यक्रमावर भर दिला होता. परंतु त्यांचें राजकीय कार्य त्यागानानें सुकर होतें ! कारण राजकीय स्वातंत्र्याचें आवाहन सर्वांच्या हृदयाला चटकन् जाऊन भिडतें. आतां यापुढें वर्गविद्वेष न चेतवितां, अखिल जनतेला विधायक कार्यासाठीं उत्साहप्रेरित करणें ही गोष्ट साध्य करूं शकेल असा समर्थ नेता भारताला मिळावा अशी प्रार्थना करणें एवढेंच आपल्या हातीं आहे.








श्री. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# ईश्वरवादी युक्तिवाद

आल्डस् हक्सले या इंग्रजी लेखकाच्या एका कादम्बरींत एका लक्षाधीशाचें पात्र आहे. या लक्षाधीशाला नरकाची फार भीति वाटत असते. त्याच्या घरीं एक शास्त्रज्ञ नोकरीवर असतो. तो त्याला नरक अस्तित्वांत नाहीं अशी ग्वाही देऊन, सारखा दिलासा देण्याचा प्रयत्न करीत असतो. पण त्या लक्षाधीशाचें तेवढ्यानें समाधान होत नाहीं व नरकाविषयींची त्याची चिन्ता कांहीं केल्या दूर होत नाहीं. असाच चिन्ताक्रान्त होऊन तो एकदां त्या शास्त्रज्ञाला विचारतो, 'काय हो ! नरक अस्तित्वांत असूंच शकत नाहीं असें तुम्ही निर्विवादपणें सिद्ध करूं शकतां काय ?' या प्रश्नाचें त्या लक्षाधीशाला हवें असलेलें उत्तर तो शास्त्रज्ञ देऊं शकत नाहीं. तो म्हणतो, 'नाहीं, मी असें निर्विवादपणें सिद्ध करूं शकत नाहीं. पण तुम्हांला एक प्रतिप्रश्न विचारूं शकतों. चन्द्राच्या न दिसणाऱ्या भागावर हिरवे हत्ती राहत नाहींत असें तुम्ही निर्विवादपणें सिद्ध करूं शकतां काय ?'

## कशावरून ?... कशावरून ?

त्या शास्त्रज्ञाच्या या प्रतिप्रश्नांत एक महत्त्वाचें तत्त्व सूचित केलें गेलें आहे. तें हें कीं, एखादें विधान खोटें आहे असें सिद्ध करतां न आलें म्हणजे तें खरें आहे, निदान खरें असण्याचा थोडा तरी सम्भव आहे, असें ठरत नाहीं. एखाद्या सज्जनाला जर म्हटलें, 'तूं वीस वर्षांपूर्वी कुणाचाच खून केला नाहींस हें सिद्ध कर पाहूं. जर तूं हें सिद्ध करूं शकला नाहींस तर तुला आम्ही फांशी देऊं.' तर तो काय उत्तर देईल ? फार तर वीस वर्षांपूर्वी झालेल्या सर्व खुनांची यादी तपासून ते कुणीं केले हें तो सांगेल. त्यांपैकीं कांहीं खुनी सांपडले नसल्यास, ते खून ज्या ठिकाणीं झाले त्या ठिकाणीं मी असणें शक्य नव्हतें, असें दाखवून देईल. खून झालेल्या इसमाशीं शत्रुत्व असण्याचें मला कांहीं कारण नव्हतें, असें पटवून देऊं शकेल. पण एवढें झाल्यावरहि त्याला आपण असें म्हणूं शकतों : 'वीस वर्षांपूर्वी झालेले जेवढे खून पोलिसांना सांपडले त्यांपेक्षां जास्त खून झालेच नाहींत कशावरून ? वीस वर्षांपूर्वी जगांत लाखों लोक मेले असतील. त्यांपैकीं एखाद्याला तूंच मारलें नसेल कशावरून ? वीस वर्षांपूर्वी तूं जेथें राहत होतास त्याच जागीं शेंकडों लोक मेले असतील. त्यांपैकीं एखाद्याच्या मरणास तूं कारणीभूत झाला नाहींस कशावरून ! त्या शेंकडों लोकांपैकीं एखादा तुझा शत्रु नसेल कशावरून ?'

'कशावरून ? कशावरून ?' च्या या माऱ्यापुढें तो सज्जन फार वेळ टिकाव धरूं शकणार नाहीं. मीं खून केला नाहीं हें सिद्ध करणें त्याला अगदीं अशक्य कोटींतलेंच वाटेल. म्हणूनच कायद्यामध्यें कोणाहि व्यक्तीनें गुन्हा केला असें सर्व रास्त शंकांचें निरसन होऊन तो सिद्ध होईपर्यंत, त्या व्यक्तीला निरपराध समजण्यांत यावें असा दण्डक आहे. असा दण्डक घालून देण्यांत कायदेपण्डितांनीं फारच मोठी तार्किक प्रतिभा प्रकट केली, असें म्हणणें भाग आहे. जगामध्यें खून करणाऱ्यांपेक्षां खून न करणाऱ्यांचेंच प्रमाण हजारों पटींनीं जास्त आहे. चोरी करणारांपेक्षां चोरी न करणाऱ्यांचेंच प्रमाण शेंकडों पटींनीं जास्त आहे. त्यामुळें ज्या व्यक्तीच्या चारित्र्याबद्दल आपल्याला विशेष माहिती नाहीं अशी एखादी व्यक्ति चोर किंवा








खुनी असण्यापेक्षां निरपराध असण्याचाच सम्भव अधिक असतो. साहजिकच, जें खरें असण्याचा अधिक सम्भव आहे तें खरें नाहीं असें म्हणणाऱ्यांवरच आपलें म्हणणें सिद्ध करण्याची जबाबदारी ( burden of proof ) येऊन पडते. आरोपीचा अपराध सिद्ध करण्याची जबाबदारी फिर्यादीची आहे, हें तत्त्व या-प्रमाणें फारच समर्पक आहे.

सिद्ध करण्याची जबाबदारी फिर्यादीवर टाकण्याला आणखी एक कारण आहे व तें म्हणजे शेंकडों अपराधी सुटले तरी चालतील, पण निरपराध्याला कधींहि शिक्षा होऊं नये, असें दंडविज्ञानाचें ध्येय आहे, हें होय. ' मीं खून केला नाहीं ' हें सिद्ध करणें फारच कठिण आहे व हें सिद्ध करण्याची जबाबदारी आरोपीवर टाकली तर बऱ्याचशा आरोपींना हें सिद्ध करतां न येऊन नाहक फांशी जावें लागेल ! उलट, आरोपीचा अपराध सिद्ध करा असें फिर्यादीला सांगितल्यामुळें, कांहीं खुनी आरोप सिद्ध न झाल्यामुळें सुटण्याचा संभव आहे एवढेंच; पण निरपराध माणसांचा बळी जाणें मात्र त्यामुळें वांचेल.

### शिवाजीच्या काळच्या मोटारी !

सिद्ध करण्याची जबाबदारी ( burden of proof ) कोणावर टाकावी याबद्दल दंडविज्ञानानें जेवढा विवेक दाखविला आहे तेवढा जर तत्त्वज्ञ व इतर विचारवंत यांनीं दाखविला असता तर पुष्कळशा विचारसरणींमधला गोंधळ कमी झाला असता ! धार्मिक विचार हें यांतलें एक महत्त्वाचें उदाहरण आहे. " ईश्वर अस्तित्वांत नाहीं असें तुम्ही सिद्ध करूं शकतां काय ? करूं शकत नसाल तर स्वतःला निरीश्वरवादी म्हणवून घेण्याचा तुम्हांला काय अधिकार ? " असें ईश्वरवादी विचारतात. त्यांचें हें विचारणें फारच विपर्यस्त आहे. ' तूं अपराधी नाहींस असें सिद्ध कर, नाहीं तर आम्ही तुला फांशी देऊं ' असें न्यायाधीशानें आरोपीला म्हणण्याचाच हा प्रकार ! ईश्वराच्या नास्तित्वापेक्षां ईश्वराच्या अस्तित्वाचाच संभव अधिक आहे असें ईश्वरवाद्यांनीं आधीं सिद्ध केल्याशिवाय, ईश्वर अस्तित्वांत नाहीं असें सिद्ध करण्याची जबाबदारी निरीश्वरवाद्यांवर येत नाहीं. ' ईश्वर अस्तित्वांत नाहीं ' असें सिद्ध करतां आलें नाहीं एवढ्यावरूनच केवळ ईश्वराचें अस्तित्व किंवा त्याच्या अस्तित्वाचा संभव सिद्ध होत नाहीं. तत्त्वज्ञानांतली कोणतीहि नवीन उपपत्ति किंवा विज्ञानांतला कोणताहि नवा सिद्धान्त जेव्हां मांडला जातो, तेव्हां ती उपपत्ति किंवा तो सिद्धान्त मांडणाऱ्यावरच तो सिद्ध करण्याची जबाबदारी असते हें सर्वमान्य आहे. जग हें प्रकृतीपासून निर्माण झालें आहे, असें कपिलमुनींनीं प्रतिपादिलें व लगेच आपल्या प्रतिपादनाच्या पुष्ट्यर्थ त्यांनीं प्रमाणें दिलीं. त्यांनीं असें म्हटलें नाहीं कीं, " जग हें प्रकृती-पासून निर्माण झालें नाहीं असें आधीं तुम्ही सिद्ध करा, नाहीं तर माझे अनुयायी व्हा. " उद्यां एखाद्या अप्रबुद्धानें शिवाजीच्या काळीं मोटारी होत्या असा ऐतिहासिक शोध लावला व या शोधाचें प्रमाण विचारतांच ' शिवाजीच्या काळीं मोटारी नव्हत्या, हें सिद्ध करा, नाहीं तर माझें म्हणणें माना ' असें तो म्हणूं लागला तर सुज्ञ लोक त्याच्या म्हणण्याची काय किंमत करतील ? सिद्ध करण्याची जबाबदारी कोणाची हें जर बरोबर ओळखतां आलें नाहीं तर विचारांत फारच गोंधळ माजतो.

### ईश्वर आणि अस्पृश्यता

ईश्वराचें नास्तित्व सिद्ध करण्याची जबाबदारी नास्तिकांवरच आहे असें प्रतिपादतांना, ईश्वरवादी कधीं कधीं ' चुकावयाचें असेल तर सुरक्षित बाजूनें तरी चुका ' या नियमाचा आधार घेतात. 'नास्ति चेन्नास्ति नो हानिः । अस्ति चेन्नास्तिको हतः । ' 'ईश्वर अस्तित्वांत नसेल, तर तो आहे असें मानल्यानें आमचें कांहींच नुकसान होत नाहीं. उलट तो अस्तित्वांत असेल तर मात्र नास्तिकाला तो नरकांत टाकील.' म्हणून ईश्वर आहे असें मानल्यानेंच कमींत कमी धोका पत्करल्यासारखें होतें. अर्थात् ' ईश्वर अस्तित्वांत नाहीं ' ही जास्त धोक्याची श्रद्धा बाळगणाऱ्या व ती पसरवूं इच्छि-णाऱ्या नास्तिकांवरच आपलें म्हणणें सिद्ध करण्याची जबाबदारी येऊन पडते. सिद्ध करण्याची जबाबदारी नास्तिकावर ढकलणारा आस्तिकाचा हा युक्तिवाद, ईश्वराचें अस्तित्व मानल्यानें कांहींच नुकसान होत नाहीं, या समजुतीवर आधारलेला आहे. चंद्राच्या न दिसणाऱ्या भागावर हिरवा हत्ती








राहतो असें मानल्यानें माझें कांहींच नुकसान होत नाहीं. कारण त्या हत्तीचा माझ्या जीवनाशीं कसलाच संबंध येत नाहीं. मीं रोज संध्या करावी कीं नाहीं डॉ. आंबेडकरांना अस्पृश्य मानावें कीं नाहीं, विधवांना जाळावें कीं नाहीं, गॅलिलिओ व कोपर्निकस् यांसारख्या ज्योतिर्विदांचा छळ करावा कीं नाहीं, ख्रिस्ती व्हायला तयार नसलेल्या एखाद्या कुधार्मिकाचीं बोटें ऐरणीवर ठेवून घणानें ठेचावीं कीं नाहीं, असल्या कोणत्याच बाबतींत मला त्या हिरव्या हत्तीकडून प्रेरणा मिळणार नाहीं. पण ईश्वरावरील श्रद्धेचें तसें नाहीं. ईश्वराबद्दल, केवळ तो अस्तित्वांत आहे, एवढी श्रद्धा कुणी बाळगीत नाहीं. ईश्वर अस्तित्वांत आहे, त्यानें मानवानें कशा तऱ्हेनें जगावें तें मनुस्मृतींत, बायबलांत किंवा कुराणांत लिहून ठेवलें आहे, या ईश्वरी आज्ञांविरुद्ध जो वर्तन करील तो पापी व ईश्वरद्वेषी असल्यामुळें त्याचा छळ करण्याचा अधिकार ईश्वरनिष्ठाला आहे, अशा तऱ्हेचें सर्व तत्त्वज्ञान ईश्वरावरील श्रद्धेच्या मागोमाग येतें, अशी इतिहासाची साक्ष आहे. ईश्वर अस्तित्वांत आहे व त्यानें आपलें मनोगत बायबलांत व्यक्त केलें आहे, अशी जर ख्रिस्ती धर्मगुरूंची श्रद्धा नसती, तर त्यांनीं गॅलिलिओ व कोपर्निकस् यांचा छळ केला असता काय ? गोमंतकांतील लोकांना ख्रिस्ती करण्यासाठीं, कुणाला जाळ, कुणाचे डोळे फोड, तर कुणाचा कडेलोट कर, अशा तऱ्हेचे अनन्वित जुलूम केले असते काय ? विधवांना जाळावें व अस्पृश्यांचा छळ करावा, असा ईश्वरी संकेत आहे अशी श्रद्धा नसती, तर या चालींतला रानटीपणा व दुष्टपणा लोकांच्या केव्हांच लक्षांत आला नसता काय ? सारांश, ईश्वरावरील श्रद्धा व एका विशिष्ट जीवनविषयक तत्त्वज्ञानावरील श्रद्धा यांचा अभेद्य संबंध आहे व या दुसऱ्या श्रद्धेमुळें मानवाचें अनेकदां अपरिमित नुकसान झालें आहे असें इतिहासावरून दिसतें. त्यामुळें ईश्वरावर श्रद्धा ठेवल्यानें कांहींच नुकसान होत नाहीं हें म्हणणें खरें मानतां येत नाहीं,

## ' खरा ' देव व ' खोटा ' देव !

बरें, ईश्वरावर श्रद्धा न ठेवण्यानें आपलें नुकसान होईल याला तरी कांहीं प्रमाण आहे काय ? ईश्वर अस्तित्वांत नाहीं असें म्हटल्याबद्दल ईश्वर नास्तिकाला नरकांत टाकील असें आस्तिक म्हणतात. पण नरकाच्या या भीतीपासून आस्तिक तरी कुठें मोकळे आहेत ? अल्लावर विश्वास न ठेवणारे नरकांत जातात असें मुसलमान मानतात व उलट आकाशांतल्या बापावर विश्वास नसणारे नरकांत जातात असें ख्रिस्ती मानतात. तेव्हां केवळ ईश्वरावर विश्वास ठेवल्यानें नरकापासून बचाव होत नाहीं. ' खऱ्या ' ईश्वरावर विश्वास असेल तरच नरकापासून सुटका होईल ! ' खोट्या ' ईश्वराला भजणें व नास्तिक होणें हें सारखेंच निंद्य आहे. पण खरा ईश्वर कोणता हें कसें ओळखायचें ? या प्रश्नाचें सर्वमान्य उत्तर देतां आलें असतें, तर जगांत धार्मिक युद्धें माजलीं नसतीं. बरें, ईश्वर नास्तिकाला नरकांत टाकतो याबद्दल तरी सर्व आस्तिकांचें एकमत आहे काय ? कांहीं आस्तिकांच्या मतें तर ईश्वराचा द्वेष करणें हा त्याच्या भक्तीचाच एक प्रकार आहे ! अशा विरोधभक्तीमुळेंच रावण मुक्त झाला. विरोधभक्तिवाद्यांचा हा पंथ सोडला तरी, ईश्वरावर श्रद्धा न ठेवणारे बर्ट्रंड रसेल, चार्वाक, गौतम बुद्ध वगैरे थोर विचारवंत नरकांत जातील असें निदान डॉ. राधाकृष्णन्, डॉ. व्हाईटहेड वगैरे ईश्वरवादी समजत असतील, असें वाटत नाहीं. तेव्हां नास्तिक नरकांत जाण्याचा जेवढा संभव आहे तेवढाच आस्तिक नरकांत जाण्याचाहि संभव असल्यामुळें, ईश्वरावर श्रद्धा ठेवल्यानें नरकाची भीति नाहींशी होते असें म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

## बंद खोलींतला सैतान

' सुरक्षित बाजूनें चुका ! ' असा आस्तिकाचा वरील उपदेश ऐकून एका गोष्टीची आठवण होते. एक चोर मोठ्या कुशलतेनें चोऱ्या करीत असे व चोरलेला माल आपल्या घरांतल्याच एका खोलींत बंद करून ठेवीत असे. कांहीं दिवसांनीं त्याच्याजवळ सोनें, चांदी वगैरे खूप गडगंज संपत्ति जमली. त्या खोलीची झडती घेतली असती तर कुणालाहि त्याच्या चोरीचा सहज पत्ता लागला असता. पण त्या खोलींत कुणी जाऊं नये म्हणून त्यानें एक नामी युक्ति केली होती. त्या खोलींत एक सैतान








राहत असून कुणींहि खोली उघडली कीं त्याच्या नरडीचा तो घोट घेतो, अशी अफवा त्यानें पसरविली. एखाद्या ' नास्तिका 'चा जर यावर विश्वास बसला नाहीं तर तो त्याला म्हणायचा, " पाहा बुवा ! या खोलींत सैतान नसेलहि कदाचित्. मीं स्वतःच तो पाहिला असता तर जिवंत तरी कसा राहिलों असतों ? पण विषाची परीक्षा पाहाच कशाला ? खोली उघडली नाहीं तर माझें कांहीं बिघडत नाहीं. मला घरांत राहायला इतर पुष्कळ जागा आहे. पण खोली उघडली आणि जर का आंत सैतान असला तर माझे दिवस भरलेच ! तेव्हां आंत सैतान आहे असेंच मी धरून चालतों झालें. तूंहि असेंच ' सुरक्षित बाजूनें ' चुकावें यांतच शहाणपणा आहे. खोली न उघडल्यामुळें तुझें नुकसान तर कांहीं होत नाहीं. व खोली उघडून तुझा कांहीं फायदाहि नाहीं. उलट आंत सैतान असलाच तर मग मात्र तुझी चांगलीच गच्छन्ती होईल. " या युक्तिवादानंतर कुणाहि 'नास्तिका'ला ती खोली उघडण्याचें धैर्य होत नसे व त्या चोराचें गुपित तसेंच राही. पण असें किती दिवस चालणार ? पुढें एका नास्तिकाला आपला जीव धोक्यांत घालूनसुद्धां त्या खोलींत सैतान आहे कीं नाहीं हें पडताळून पाहण्याची इच्छा झाली. तो त्या चोराकडे जाऊन म्हणाला, ' तुझा सैतान मला खाणार असेल तर खाऊं दे ! मी आज या खोलींत जाणारच. ' चोरानें आपले नेहमींचे सर्व युक्तिवाद त्याला सांगितले. पण तो नास्तिक कांहीं केल्या ऐकेना. शेवटीं चोरानें निरुपायानें खोलीचें दार उघडलें. नास्तिक आंत गेला; पाहतों तों काय ! त्याला मोठमोठ्या प्रसिद्ध चोऱ्यांचा तलास लागला. चांदमल शेटांचा मोत्यांचा हार, श्रीमंत गुप्त्यांच्या घरच्या पाटल्या, चिटणिसांकडचें दोन हजार रुपयांचें रिस्टवॉच, बडोद्याच्या महाराणीचा हजारों रुपये किंमतीचा कोट, सर्व कांहीं आंत अगदीं एखाद्या दुकानांतल्यासारखें व्यवस्थित मांडून ठेवलेलें होतें. तें सर्व पाहून चोराचें बिंग आपल्याला समजलें म्हणून नास्तिक फारच हर्षित झाला. पण त्याचा हर्ष फार वेळ टिकला नाहीं. बाहेर जाण्यासाठीं तो परत फिरला तोंच तो चोर हातांत खंजीर घेऊन उभा असलेला त्याला दिसला. सर्व दारें व खिडक्या बंद होत्या. चोर मोठ्यानें हंसून म्हणाला, ' पाहिलास या खोलींतला सैतान ? घे आपल्या गैरधाडसाचें प्रायश्चित्त ! ' आपलें वाक्य पुरें व्हायच्या आंतच त्यानें नास्तिकाच्या पोटांत खंजीर खुपसला ! त्याचा मृत देह त्यानें त्याच खोलींत खोल पुरून टाकला !— दुसऱ्या दिवशीं गांवांत जिकडे तिकडे बातमी पसरली : नास्तिकाला आपल्या श्रद्धाहीनतेचें व पापाचें प्रायश्चित्त मिळालें. सैतानानें त्याला एका घासांत खाऊन टाकलें !

ईश्वराचें अस्तित्व प्रत्यक्ष व अनुमान यांनीं सिद्ध होऊं शकत नसलें, तरी पवित्र पुरुषांना अतींद्रिय व तर्कातीत अशा ज्ञानानें ईश्वराचा साक्षात्कार होतो व हेंच ईश्वराच्या अस्तित्वाचें सर्वांत मोठें प्रमाण आहे, असें ईश्वरवादी बहुधा म्हणतात. पण कधीं कधीं अशा ' बाबावाक्यं प्रमाणम् ' नें त्यांचें समाधान होत नाहीं व 'आम्ही शुद्ध तर्काच्या आधारें ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करून दाखवितों,' अशी ते प्रतिज्ञा करतात. अशा वेळीं ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करण्यासाठीं ते तीन प्रकारचे युक्तिवाद करतात. त्यांना आपण अनुक्रमें ( १ ) मूलकारण—युक्तिवाद ( २ ) विश्वाच्या नियमबद्धतेवरून केलेला युक्तिवाद ( ३ ) हेतु—युक्तिवाद अशीं नांवें देऊं. या युक्तिवादांची चर्चा करण्याचें येथें योजिलें आहे.

यांपैकीं मूलकारण—युक्तिवाद सर्वांच्या परिचयाचा आहे. ' प्रत्येक वस्तूला कांहीं तरी कारण असतें. त्याचप्रमाणें जगाला देखील कारण असलें पाहिजे व हें कारण म्हणजेच ईश्वर होय ' असा तो युक्तिवाद आहे. हा युक्तिवाद इतका भोंगळ आहे कीं, त्यांतील तर्कच्युति व विसंगति सात-आठ वर्षांच्या मुलाला देखील कळूं शकते. प्रत्येक वस्तूला जर कारण असतेंच तर ईश्वराला देखील कारण असलेंच पाहिजे व जगाचा निर्माता म्हणून ईश्वर मानायचा तर ईश्वराचाहि निर्माता असा एखादा मोठा ईश्वर असला पाहिजे ! ईश्वरानें जर जग निर्मिलें तर ईश्वराला कुणीं निर्माण केलें, असें लहान मुलेंदेखील विचारतात. त्यांचें हें विचारणें पोरकट आहे असें समजून प्रौढ लोक तिकडे

दुर्लक्ष करतात. पण वस्तुतः लहान मुलांच्या निरागस मनाला जें सहज कळतें, तें पुढें अंधश्रद्धामय वातावरणांत वाढल्यावर प्रौढांना कळेनासें होतें असें म्हटलें पाहिजे. ‘ईश्वर हा स्वयम्भू व कारणातीत आहे व त्यामुळें ईश्वराला कोणीं निर्मावें लागत नाहीं’ असें प्रौढ लोक वरील प्रश्नाला उत्तर देतात. हें उत्तर ‘मी माझी पोळी राखूनहि ठेवीन व खाऊनहि टाकीन’ अशा अट्टहासासारखें हास्यास्पद आहे. ईश्वर कारणातीत असेल तर ‘सर्व वस्तूंना कारण असतें’ हा नियमच खोटा पडतो व मग त्या नियमाच्या आधारें ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करतां येत नाहीं. ईश्वराला जर कारण लागत नाहीं, तर जगाला तरी कारण कशाला पाहिजे? ईश्वरासारखेंच जग देखील स्वयम्भू कां असूं शकत नाहीं? ईश्वराची अनावश्यक कल्पना करून मग त्याला स्वयम्भू मानण्यापेक्षां ज्याचें अस्तित्व प्रत्यक्षसिद्ध आहे अशा जगालाच स्वयम्भू मानणें जास्त सयुक्तिक आहे. एका दीडशहाण्या राजानें आपल्या राजधानीच्या भोंवतीं सुरक्षिततेसाठीं तट्ट्याची भिंत बांधविली व मग ती फार कच्ची आहे म्हणून त्या भिंतीच्या बाहेर दुसरी एक दगडी भिंत बांधविली, तसलाच प्रकार या कारणकल्पनेंत होतो! आधीं एक कच्ची भिंत बाधायची व मग ती कच्ची आहे म्हणून दुसरी पक्की बांधायची, यापेक्षां एकदम पक्कीच भिंत कां बान्धूं नये? आधीं सुसंभुशीत अशी कारणकल्पना करायची व मग ती टिकत नाहीं म्हणून स्वयम्भूपणाची बुद्धिग्राह्य कल्पना करायची, त्यापेक्षां आधींच स्वयम्भूपणाची कल्पना कां करूं नये?

### पागलखान्यांतला राजपुत्र

मूलकारण-युक्तिवादाचा दुसरा दोष असा कीं, जगाला कारण असलें पाहिजे असें मानलें तरी त्या कारणाला ईश्वर म्हणतां येईलच असें नाहीं. जगाचें कारण प्रकृति व पुरुष यांचा संयोग हें आहे असें सांख्यतत्त्वज्ञान सांगतें. पुरुष म्हणजे आत्मा; व प्रकृति हें एक जड तत्त्व आहे. तेव्हां यांपैकीं एकालाहि ईश्वर ही संज्ञा देतां येत नाहीं. ‘ईश्वर हें जगाचें कारण आहे हें आम्हांला मान्य नाहीं’ असें एका हरवलेल्या सांख्यकारिकेंत म्हटलें असल्याचें लो. टिळकांनीं दाखवून दिलें आहे. अर्थात्, जगाल कारण असलें पाहिजे असें म्हणणारे विचारवंत सुद्धां त्या कारणाला ईश्वर मानायला तयार होतीलच असें दिसत नाहीं. एका ग्रीक तत्त्वज्ञानें पाण्यापासून जग निर्माण झालें असें म्हटलें आहे. पिथॅगोरसनें संख्येपासून जग निर्माण झालें असें म्हटलें आहे. कणादानें परमाणु हेंच जगाचें कारण मानलें आहे. परमाणु, संख्या किंवा पाणी या वस्तूंना कोणताहि शाबूत डोक्याचा प्रामाणिक माणूस ईश्वर म्हणेल असें वाटत नाहीं. ईश्वर जगाचें जड कारण नसून, तो न्यायी, दयाळू व सर्वज्ञ असा जगाचा चैतन्यशाली निर्माता आहे, अशी ईश्वरवाद्यांची धारणा आहे. न्यायीपणा, दयाळूपणा इत्यादि नैतिक गुण व सर्वज्ञता हा बौद्धिक गुण अंगीं असल्याशिवाय कोणत्याहि तत्त्वाला ईश्वर अशी संज्ञा देतां येणार नाहीं. एक वेडा ‘माझा बाप इंग्लंडचा राजा आहे व मी राजपुत्र आहे’ असें सांगत फिरायचा. ‘तुझा बाप कुठें इंग्लंडचा राजा आहे? इंग्लंडचा राजा तर राणी एलिझाबेथ आहे. तुझा बाप म्युनिसिपालिटींत चपराशाची नोकरी करतो आहे’ असें त्याला कुणीं उत्तर दिलें तर तो म्हणायचा ‘अहो, जो कुणी इंग्लंडचा राजा असेल त्यालाच मी आपला बाप मानतों!’ ईश्वरवाद्यांची गत या वेड्यासारखीच आहे. ‘ईश्वर जगाचें कारण आहे’ असें ते आधीं म्हणतात. पण हें जगाचें कारण ईश्वर हें नसून ‘परमाणु’ किंवा ‘ब्रह्म’ असें दुसरेंच कांहीं तरी आहे असें एखाद्यानें सिद्ध केलें कीं ते लगेच म्हणतात, ‘अहो, जगाचें जें कांहीं कारण असेल त्यालाच आम्ही ईश्वर म्हणतों!’

### जग व तान्दुळाचा ढीग

मूलकारण-युक्तिवादांतला तिसरा दोष असा कीं, जो न्याय जगांतल्या प्रत्येक वस्तूला लागू आहे तो सर्व जगाला लागू होईलच असें नाहीं, हें तत्त्व त्यांत दृष्टीआड केलें गेलें आहे. तान्दळाच्या ढिगांतला प्रत्येक कण लहान असतो, पण म्हणून तो ढीग लहान असतो असें ठरत नाहीं. लहान हें विशेषण ढिगाच्या प्रत्येक कणाला लागूं होतें, पण ढिगाला लागूं होत नाहीं. सैन्यांतल्या प्रत्येक शिपायाला दोन हात असतात, म्हणून त्या








सैन्यालाच दोन हात असतात असें ठरत नाहीं. त्याचप्रमाणें जगांतल्या प्रत्येक वस्तूला कारण असलें तरी सर्व जगाला कारण असेलच असें म्हणतां येत नाहीं. हाच अर्थ इंग्रजींत 'Causality is true within the world and not of the world' असा व्यक्तवितात.

वरील उदाहरणांवर तीं विपर्यस्त असल्याचा कदाचित् आरोप येईल. "घटकांचे गुणधर्म ते ज्या पदार्थांचे घटक आहेत त्याला नेहमींच लागू होतील असें नाहीं. पण घटकांचे बरेच गुणधर्म घटित पदार्थाला देखील अनेक वेळां लागू होतात हें दाखवून देणें कठीण नाहीं. माळेंतलें प्रत्येक फूल लाल असेल तर ती माळ लाल आहे असें आपण म्हणतों; एखाद्या वर्गातला प्रत्येक मुलगा मूर्ख असेल तर तो वर्गच मूर्ख आहे असें आपण म्हणतों. त्याचप्रमाणें जगांतली प्रत्येक वस्तु सकारण आहे म्हणून जगहि सकारण आहे असें म्हणायला कोणती हरकत आहे ?" असें ईश्वरवादी विचारतील.

त्यांना उत्तर एवढेंच कीं, मूलकारणयुक्तिवादाला पुष्पमालेच्या दृष्टान्तापेक्षां तांदळाच्या ढिगाचाच दृष्टान्त अधिक लागू आहे. कारण जग या संज्ञेंत अस्तित्वांत असलेल्या सर्व वस्तूंचा समावेश होतो. जगांतील इतर पदार्थांसारखाच जग हा एक पदार्थ नाहीं. जग या संज्ञेंत कार्यांचा अंतर्भाव होतो, त्याचप्रमाणें कारणांचाहि अंतर्भाव होतो. अर्थात्, सर्व कारणें जगांतच अंतर्भूत आहेत व जगाच्या बाहेर कांहींच अस्तित्वांत नाहीं, त्यामुळें जगाचें जगापेक्षां वेगळें असें कारण शोधूं जाणें व्यर्थ आहे. 'जग म्हणजे अस्तित्वांत असलेल्या यच्चयावत् वस्तू व ईश्वर हें या जगाचें कारण' असें जर म्हटलें, तर ईश्वर ही अस्तित्वांत असलेली वस्तु नाहीं असें म्हणावें लागेल व तें निरीश्वरवाद्यांच्याच पथ्यावर पडेल. ईश्वर जर अस्तित्वांत असेल तर त्याचा समावेश जगांतच होईल व मग ईश्वर हें जगाचें कारण आहे असें म्हणतां येणार नाहीं. सकारणता हा गुणधर्मच असा आहे कीं, तो जगांतल्या वस्तूंना लागू असला तरी जगाला लागू होऊं शकत नाहीं.

## हस्ताक्षर व मुद्राक्षर

मूलकारण-युक्तिवादांची याप्रमाणें वासलात लावल्यावर आपण नियमबद्धतेच्या युक्तिवादाकडे वळूं. जग हें नियमबद्ध असल्यामुळें जगाला बुद्धिमान् असा कर्ता असला पाहिजे असा तो युक्तिवाद आहे. "सूर्य रोज ठराविक वेळेला व पूर्वेकडेच उगवतो. सूर्योदयाच्या वेळेंत ऋतुपरत्वें फरक पडला तरी तो फरक देखील नियमबद्ध असतो व पुढच्या वर्षी अमुक दिवशीं सूर्य केव्हां उगवेल हें शास्त्रज्ञांना सांगतां येतें. चंद्राची पृथ्वीभोंवतींची गति, पृथ्वीची सूर्याभोंवतींची गति इत्यादि सर्व घटना इतक्या सूत्रबद्ध व नियमबद्ध आहेत कीं, एखाद्या शिस्तबाज सैन्याचें संचलन देखील एवढें पद्धतशीर असत नाहीं. अशा पद्धतशीर घटना कुणीं तरी बुद्धिपुरःसर घडवून आणल्याशिवाय कशा घडतील ?"

नियमबद्धतेच्या या युक्तिवादांत देखील मूलकारण-युक्तिवादासारखेच अनेक हेत्वाभास आहेत. बुद्धिपुरःसर केलेले व्यापार जड वस्तूंच्या व्यापारापेक्षां जास्त नियमबद्ध असतात अशी कल्पना या युक्तिवादानें गृहीत धरली आहे. पण हें खोटें असल्याचें सहज दाखवून देतां येईल. हातानें लिहिलेलें अक्षर हा बुद्धिमान् व्यक्तीचा व्यापार आहे व छपाईचें अक्षर हा त्या मानानें जड यंत्राचा व्यापार म्हणून तो बुद्धिहीन वस्तूचा व्यापार आहे. पण असें असून देखील छपाईचें अक्षर हस्ताक्षरापेक्षां जास्त नियमबद्ध व सुव्यवस्थित असतें कीं नाहीं ? गवयाला गाणें म्हणायला सांगितलें तर तो प्रत्येक वेळीं अगदीं हुबेहूब तसेंच गाणें म्हणूं शकणार नाहीं. कधीं त्याचें चित्त तल्लीन न झाल्यामुळें त्याचें गाणें रंगणार नाहीं, तर कधीं त्याचें सर्व व्यक्तित्वच संगीतमय होऊन स्वतःला न कळत तो हृदयाचा ठाव घेणाऱ्या ताना छेडूं लागेल. पण तेंच त्याच्या गाण्याची जर ध्वनिमुद्रिका घेतली तर ती प्रत्येक वेळीं अगदीं तसेंच गाणें म्हणेल. त्यांत कोणताहि फरक पडणार नाहीं. जड व्यापारापेक्षां बुद्धियुक्त व्यापार जास्त नियमबद्ध असतात हें विधान किती निर्मूल आहे व उलट जिवंत व्यक्तींच्या व्यापारापेक्षां निर्जीव वस्तूंचेच व्यापार












कसे जास्त नियमित व सुसूत्र असतात असें दाखविणारी आणखी किती तरी उदाहरणें देतां येतील. तेव्हां जग नियमबद्ध आहे यावरुन केलेला युक्तिवाद ईश्वरवाद्यांच्याच अंगलट येतो. कारण जगांतले व्यापार हे बुद्धिमय व्यापार नसून जडाचेच व्यापार आहेत असें त्यांच्या नियमबद्धतेवरुन म्हणतां येईल.

## माकडाचें टायपिंग

दुसरें असें कीं बुद्धिमान् अशा कर्ता असल्याशिवाय नियमबद्ध क्रिया घडूंच शकत नाहींत, असें नाहीं. नियमबद्ध क्रिया अगदीं नियमशून्य अशा शक्तींकडून देखील केवळ योगायोगानें घडून येऊं शकतात. एखादें माकड जर रोज दहा तास आयुष्यभर टाइपरायटरवर टक्टक् करीत बसलें तर दहा-पंधरा वर्षांत एक तरी शुद्ध इंग्रजींतलें अर्थपूर्ण वाक्य त्याच्या हातून टाईप होईल. त्यांत कांहींच अशक्य नाहीं. टाईपरायटरवर असलेल्या सव्वीस इंग्रजी मुळाक्षरांची लाखों तऱ्हांनीं जुळवणी होऊं शकते. या लाखों तऱ्हांच्या जुळवणीमध्यें कांहीं अक्षरसमूह अर्थपूर्ण असतील व कांहीं नसतील. माकडानें जर दहा-पंधरा वर्षें टाइपरायटरवर टक्टक् केलें तर हजारों प्रकारचे अक्षरसमूह त्याच्या हातून टाईप होतील व या हजारोंपैकीं एखादा केवळ यदृच्छेनें अर्थपूर्ण असूं शकेल. संस्कृतमध्यें याला 'घुणाक्षरन्याय' म्हणतात. किड्याच्या चालीनें देखील एखाद्या वेळीं अक्षर उमटतें. अर्थात्, किड्याच्या चालीनें अक्षर उमटेल तें, किडा लाख वेळां चालला तर त्या लाख वेळांतून एखाद्या वेळींच उमटेल. म्हणून किड्याच्या चालीनें अक्षर उमटेपर्यंत आपल्याला फार वेळ वाट पाहावी लागेल. किड्याच्या दहा-पंधराच चाली पाहिल्या तर त्यांपैकीं एकींतहि अक्षर उमटलें नाहीं असें बहुधा आढळून येईल. नियमबद्ध व अर्थपूर्ण अशी कृति केवळ योगायोगानें घडायला याप्रमाणें पुष्कळ काळ लोटावा लागतो. ही अडचण जगांतील नियमबद्धता निर्माण होण्याच्या बाबतींत फारशी आडवी येत नाहीं. कारण जग निर्माण होऊन लाखों वर्षांचा काळ लोटला असला पाहिजे. एवढा काळ जगांतील नियमबद्धता केवळ योगायोगानें निर्माण होण्यास देखील पुरेसा आहे. तेव्हां जग नियमबद्ध आहे एवढ्यावरुन तें एखाद्या बुद्धिमान् कर्त्यानें निर्माण केलें असलें पाहिजे असें सिद्ध होत नाहीं.

## आईचें दूध व उंटाची खदार

नियमबद्धतेच्या युक्तिवादासारखाच पण त्याहून थोडा वेगळा असा ईश्वरवाद्यांचा एक युक्तिवाद आहे. त्याला हेतु-युक्तिवाद असें म्हणतात. तो असा : " जग हें नियमबद्ध आहे एवढेंच नव्हे, तर तें हेतुपूर्वक केलें गेलें आहे असें दिसतें. एखाद्या निर्जन प्रदेशांत भ्रमण करतांना जर आपल्याला एखादी झोपडी सांपडली व त्या झोपडींत चूल, सैंपाकाचें सामान, अंथरुण वगैरे दिसलें तर हें सर्व कुणीं तरी माणसानें तयार केलें आहे असें आपण एकदम अनुमान काढतों. कारण झोपडी माणसाला राहण्यासाठींच बांधली जाते, चूल सैंपाक होऊन त्याचें पोट भरावें म्हणून मांडली जाते व पलङ्ग त्याला सुखानें झोंपतां यावें म्हणून केला जातो. वरील प्रत्येक पदार्थ कोणत्या तरी हेतूनें तयार केलेला असतो. त्यांत कांहीं तरी प्रयोजन असतें. निर्हेतुक नियमबद्धता जरी योगायोगानें किंवा जड कारणामुळें उत्पन्न होऊं शकली तरी याप्रकारची हेतुपूर्वक नियमबद्धता बुद्धिमान् कर्त्याशिवाय दुसरें कुणीहि निर्मूं शकणार नाहीं.— ' झोपडी जशी हेतुपुरःसर निर्मिलेली आहे असें आपण म्हणतों, त्याचप्रमाणें जग देखील हेतुपुरःसर निर्मिलेलें आहे असें म्हटलें पाहिजे. स्त्री-पुरुषांची शरीररचना पाहिली तर ती दोघांचा शारीरिक सम्बन्ध व्हावा म्हणून कुणीं तरी मुद्दाम केलेली आहे असें म्हणण्याचा मोह होतो. तसेंच मूल झाल्याबरोबर आईच्या स्तनांत दूध येतें तें त्या मुलाचें पोट भरावें म्हणून मुद्दाम एखाद्या दयाघन व्यक्तीनें योग्य वेळीं निर्मिलें असावें असें वाटतें. पुढें इतर अन्न पचविण्याची मुलांत शक्ति आल्याबरोबर हें दूध हळूहळू नाहींसें होतें. हा प्रकारहि उन्हाळा संपल्यावर वाळ्याच्या ताट्या व पंखे जरुर संपली म्हणून आपण काढून टाकतों, त्या प्रकारासारखाच हेतुपुरःसर वाटतो. थण्ड प्रदेशांत राहणाऱ्या प्राण्यांच्या अंगावर ऊबदार लोंकर असते व वाळवंटांत चालणाऱ्या उंटाचे पाय भाजूं नयेत म्हणून त्याच्या खुरांवर उष्णतानिवारक वेष्टन












असतें. जिथें मैलोगणती पाण्याचें दर्शन होत नाहीं अशा प्रदेशांत तो तहानेनें व्याकुळ होऊं नये म्हणून पाण्याचा भरपूर सांठा करण्याचीहि त्याच्या शरीरांत व्यवस्था असते. जगांतील हेतुपुरःसर रचनांचीं अशीं किती तरी उदाहरणें देतां येतील. मग निर्हेतुक नियमबद्धता बुद्धिमान् कर्त्याशिवाय सिद्ध होऊं शकली तरी, जगांतली ही सहेतुक नियमबद्धता एखाद्या बुद्धिमान् व्यक्तीनें बुद्धिपुरःसर निर्मिली असेल, असें समजण्यास कोणती हरकत आहे ? "—असा हा युक्तिवाद आहे.

### महारोगाहि सहेतुकच आहे काय ?

वरील युक्तिवादाला अनेक तऱ्हांनीं उत्तर देतां येण्यासारखें आहे. एक तर जगांतल्या कांहीं गोष्टी सप्रयोजन व सहेतुक दिसत असल्या, तरी इतर अनेक गोष्टी अशा दाखवून देतां येतील कीं, ज्यांचें अस्तित्व अगदींच अप्रयोजक वाटतें. बकरीच्या तोंडावरील स्तन, काखेंतले केंस वगैरे गोष्टी निरर्थक म्हणून प्रसिद्ध आहेत. पुरुषाच्या दाढी-मिश्या देखील अगदींच निरुपयोगी व म्हणून रोज वस्तऱ्यानें खोडून टाकल्या पाहिजेत असेंहि मत हल्लीं प्रचलित आहे. मूल झाल्याबरोबर आईच्या स्तनांत दूध येतें यावरून विश्वांतील घटनांची सहेतुकता ज्यांना पटते, त्यांनीं जिच्यांत नुकताच यौवनाचा संचार झालेला आहे व जीं तरुणांचीं मनें मोहून टाकूं लागली आहे अशा युवतीच्या चेहऱ्यावर अगदीं नको तेव्हां फुटणाऱ्या व तिला विद्रूप करणाऱ्या पुटकळ्यांची आठवण विसरूं नये ! पाऊस पडल्यामुळें अन्न पिकतें व म्हणून पाऊस कुणी तरी हेतुपुरःसर पाडला असावा असें अनुमान करणाऱ्यांनीं, सुपीक शेतावर ज्याप्रमाणें पाऊस पडतो त्याचप्रमाणें जेथें त्याचा कांहींहि उपयोग नाहीं अशा समुद्रावरहि तो पडतो हें लक्षांत ठेवावें. जलनिधीवर हेतुपूर्वक पाऊस पाडणारा देव अगदींच निर्बुद्ध असला पाहिजे. जगांतील निर्हेतुक घटनांचीं वरील उदाहरणें निदान भयंकर व आपत्तिमय तरी नाहींत. पण क्षणार्धांत लाखों जीवांना जिवंत पुरणारा भूकम्प, कागदाला खाणाऱ्या कसरीप्रमाणें हळूहळू शरीराला कुरतडून पंगु करणारा महारोग व अन्धकाराच्या सागरांत जिवन्तपणीं गुदमरत ठेवणारी जन्मान्धता—अशांसारख्या घटनाहि सहेतुकच आहेत, एवढेंच नव्हे, तर दयाघन ईश्वरानें त्या हेतुपूर्वक आखाविल्या आहेत असें म्हणणारे एक तर निर्बुद्ध तरी असावेत नाहीं तर दुष्ट व निर्घृण तरी असावेत. जगांतील सर्वच किंवा बहुंश घटना सहेतुक आहेत असें म्हणायला याप्रमाणें काडीचाहि आधार नाहीं.

---

## एक मूठभर अस्थि नसाव्या— !

एक मूठभर अस्थि नसाव्या
अंजलिभरहि रक्त नसावें
उसळत प्रेमाचे शतसागर
विशाल निर्मल हृदय असावें.

कुठें मुखावर कानीं डोळीं
सुंदरतेची साक्ष नसावी
परंतु ओठांवर बालांचीं
स्मितें निरागस सदा हंसावीं.

वाणीच्या ऋजु माधुर्यानें
फिके पडावे मधुचे सागर
व्यक्तित्वानें खुजें दिसावें
हिमालयाचें गौरीशंकर.

मानवतेचे पुसीत अश्रू
पावन ते नित पाय फिरावे
एक असावी काठी हातीं
एक वस्त्रही पुरें नसावें

सांभाळुनि हीं निज अवधानें
घडीव जा जी घडेल प्रतिमा
—आणि मुशींतून बापूजींची
मंगल मूर्ति ओंती ब्रह्मा.

—देवदत्त दाभोलकर

[ सुप्रसिद्ध कन्नड साहित्यिक टी. पी. कैलासम् यांच्या ' The Recipe ' या कवितेचा मुक्त अनुवाद ]







# • • • विश्वाचें भवितव्य

आइन्स्टिनच्या सापेक्षता-सिद्धान्ता-( Theory of Relativity ) चा एक महत्त्वपूर्ण परिपाक म्हणजे त्या सिद्धान्तानें प्रगट केलेलें अवकाशा-( space ) चें स्वरूप. या सिद्धान्तानुसार अवकाश हा निश्चित, मर्यादित पण सीमाहीन ( finite but unbounded ) आहे. युक्लिडीयेतर ( non-Euclidean ) अवकाश ' मर्यादित पण सीमाहीन ' असणें शक्य आहे. या बाबतींत घनगोला-( sphere ) चें उदाहरण देतां येईल. घनगोल हा ' मर्यादित पण सीमाहीन ' Two-Dimensional Continuum असें त्याच्या पृष्ठभागाचें वर्णन करतां येईल. त्यावरील त्रिकोणाच्या कोनांची बेरीज दोन काटकोनांबरोबरच असते असें नाहीं. त्याच्या पृष्ठभागावर भ्रमण करणाऱ्या प्राण्याच्या प्रगतीला कुठेंच प्रतिबंध वा शेवट नाहीं. Third Dimension चें ज्ञान नसल्यानें तो या पृष्ठभागासच धरून कोणत्याहि दिशेला अनिर्बंधपणें अव्याहत फिरूं शकेल. तो फिरून त्याच ठिकाणीं येईल; पण या पृष्ठभागावकाशांत त्याची प्रगति थोपविणारी सरहद्द नाहीं, सीमा नाहीं. अशा रीतीनें हा अवकाश ' सीमाहीन ' असला तरी ' मर्यादित ' आहे. कारण, प्रगतीच्या पृष्ठभागावकाशाचें एकंदर क्षेत्र मर्यादितच आहे. याच पद्धतीनें गणितशास्त्रदृष्ट्या त्रिमित्यंगात्मक ( Three-Dimensional ) ' मर्यादित पण सीमाहीन ' निर्युक्लिड अवकाशाचें अस्तित्व प्रस्थापित करतां येईल.

आइन्स्टिनचा हा ' मर्यादित पण सीमाहीन ' अवकाश चित्रित करतां येणार नाहीं. त्याची कल्पना करणेंहि जरा कठीणच आहे, पण अशक्य नाहीं. एडिंग्टनच्या रूपकांत वर्णन करावयाचें झाल्यास, " अवकाश हा विस्ताराच्या दृष्टीनें नव्हे तर पुनः-प्रवेशदृष्ट्या सीमाहीन आहे. ज्याला अस्तित्व आहे ( जें कांहीं आहे ) तें नास्तित्वाच्या ( जें कांहीं नाहीं त्याच्या ) अनंतत्वांत तरंगणारें कवच आहे. हॅम्लेट म्हणतो त्याप्रमाणें, ' चिमुकल्या कवचांत बंदिस्त राहून मी स्वतःला अनंतत्वाचा राजा मानूं शकेन.' " दुसरें रूपक गोया या सुप्रसिद्ध स्पॅनिश चित्रकाराच्या थडग्याच्या चित्राच्या द्वारें देतां येईल. थडग्यांतील प्रेताचें एक बोटच फक्त वर आहे. तें बोट सांगत आहे कीं, ' इकडे या बाजूस कांहींहि नाहीं. ' ! अवकाशाचें स्वरूप असें तर मग कालाचें स्वरूप काय ? हा प्रश्नहि उपस्थित होतो. कालहि समर्याद आहे काय ? का तो अनाद्यनन्त आहे ? सापेक्षता-सिद्धान्तानुसार अवकाश वक्र, गोलरूप आहे. तो वळण घेतो आणि पूर्व दिशा पश्चिम दिशा होऊं शकते. तरी कालालाहि वक्रता आहे काय, कीं ज्यामुळें भूतकालाचा भविष्यकाल होऊं शकेल ? म्हणजे कालप्रवाहाची दिशा बदलूं शकते काय ? या कालस्वरूपविषयक प्रश्नांवर प्रकाश टाकणारी विश्वप्रसरण-( Expanding Universe ) नामक एक घटना विज्ञानांत आहे. आधुनिक खगोलशास्त्रज्ञांच्या संशोधनानुसार विश्व सतत प्रसरण पावत आहे; विश्व म्हणण्यापेक्षां, अवकाशच प्रसरण पावतो आहे. या घटनेचें रूपकात्मक वर्णन सुबोध आहे. तारे, ग्रह, नक्षत्रें आणि त्यांचे समूह सारे जणूं अवकाशरूपी रबरी फुग्याच्या पृष्ठभागावर मढविलेले आहेत आणि हा फुगा सतत, संथपणें फुगतो आहे. मढविलेल्या जड पदार्थांच्या








आकारविस्तारांत फरक न पडतां त्या फुग्याची खरी कातडीच फक्त प्रसरण पावत आहे. या विश्वप्रसरणरूपी घटनेची तार्किक परिणति अशी कीं काल हाहि समर्याद आहे; कालाला आदि आहे तसा अन्तहि आहे. विश्वप्रसरण कालप्रवाहाची दिशा दर्शविते; विश्वाचा कुणी तरी निर्माता असावा आणि तें नाशवंत असावें, असें त्यावरून अनुमान निघतें.

कालस्वरूपाविषयीं वरील विश्वप्रसरणाच्या घटनेवरून काढण्यांत आलेलीं अनुमानें निव्वळ तार्किक व कल्पनामय आहेत. कालाचें स्वरूप, विश्वोत्पत्ति, विश्वनिर्माता आणि विश्वप्रलय यांसंबंधींच्या दैवी उपपत्तींचा पुरावा म्हणून मानण्यांत येणारी, विश्वप्रसरणघटनेपेक्षां निराळी, पण निश्चित, सुस्पष्ट, तर्कशुद्ध, खंडन करण्यास कठीण अशी आणखी एक घटना पदार्थविज्ञानांत आहे. ती म्हणजे— जुन्या पदार्थविज्ञानाचा एकुलता एक आधारस्तंभ म्हणून अजूनपर्यंत टिकाव धरून राहिलेला ' उष्णतागतिशास्त्राचा दुसरा नियम ' (Second Law of Thermodynamics ) आणि तदनुषंगिक ' उष्णतेच्या अगतिकतेचें तत्त्व ' किंवा ' उष्णता-साम्यप्रवृत्तीचें तत्त्व '.

उष्णतातेज[1] ( Heat Energy ) हा अणुपरमाणूंच्या गतीचा आविष्कार होय, अशा तऱ्हेचा सिद्धान्त प्रथम न्यूटन, हूक व बॉयिल् या शास्त्रज्ञांनीं पुरस्कृत केलेला होता. उष्णतातेजाचा हा गतिरूपात्मक सिद्धान्त १८ व्या शतकांत अमान्य ठरून त्याऐवजीं ' कॅलॉरिक ' नामक म्हणजे उष्णता प्रवाही पदार्थ आहे असा सिद्धान्त रूढ झाला होता. १८ व्या शतकांत उष्णता हा एक पाण्याप्रमाणें वाहणारा प्रवाही पदार्थ ( Fluid ) आहे अशी समजूत होती. या प्रवाही पदार्थास ' कॅलॉरिक ' हें नांव देण्यांत आलें होतें. या प्रवाही पदार्थाचा वस्तूशीं संयोग झाल्यामुळें वस्तूचें उष्णतामान वाढतें आणि ' कॅलॉरिक 'चे कण एकमेकांपासून परावृत्त झाल्यानें वस्तु प्रसरण पावते, असा समज होता. पण पाण्याचें बर्फ झाल्यावर पाणी आकुंचन पावण्याऐवजीं प्रसरण कां पावतें या घटनेचा या सिद्धान्ताला अर्थ लावतां येईना. शेवटीं १७९८ मध्यें काउंट रम्फोर्ड या शास्त्रज्ञानें या प्रवाही पदार्थरूप सिद्धान्तास जबरदस्त धक्का दिला. म्यूनिक येथें शस्त्रास्त्रांच्या कारखान्यांत धातूच्या तोफेस भोंक पाडीत असतां त्याला असें आढळून आलें कीं, केवळ घर्षणानें अमर्यादित प्रमाणांत उष्णता निर्माण होऊं शकते. अर्थात्, अशा तऱ्हेनें प्रचंड प्रमाणांत निर्माण होणारी चीज 'पदार्थ' असूंच शकणार नाहीं; फक्त गतीच प्रचंड प्रमाणांत वाढणें शक्य असल्यामुळें, उष्णता ही गतीचाच आविष्कार असला पाहिजे, असा निष्कर्ष रम्फोर्डनें काढला. आणखी प्रायोगिक पाठपुराव्याच्या आधारें उष्णतेचा गतिरूपात्मक सिद्धान्त प्रस्थापित झाला. रम्फोर्डनें उपयोगांत आणलेलें भोंकें पाडण्याचें यंत्र घोड्यांकडून चालविलें जात होतें. तेव्हां घोड्यांनीं खर्चीं घातलेले श्रम म्हणजे घोड्यांनीं केलेलें काम आणि निर्माण झालेली उष्णता यांच्यांत कांहीं प्रमाणबद्ध नातें आहे काय, असा प्रश्न उपस्थित झाला. १८४० मध्यें जूल या शास्त्रज्ञानें सप्रयोग सिद्ध

---

१. या लेखांत Energy या शब्दाला ' तेज ' हा प्रतिशब्द वापरला आहे. ' शक्ति ' या शब्दापेक्षां ' तेज ' हाच प्रतिशब्द अधिक योग्य वाटतो. आइन्स्टिनच्या सापेक्षता-सिद्धान्तानुसार जड पदार्थ ( Matter ) आणि तेज ( Energy ) हीं एकाच मूलभूत सत्याचे आविष्कार होत ( Matter is energy and energy is matter ). ज्याप्रमाणें जड पदार्थाला वस्तुमान ( Mass ) आहे तद्वतच तेजालाहि तें आहे; आणि जडाचें तेजांत आणि तेजाचें जडांत रूपांतर होऊं शकतें. अर्थात् Energy चें स्वरूप जडात्मक ( Materialistic ) आहे आणि तेज हा पर्याय मूलभूत वास्तवतेचें जडवादात्मक ( Materialism च्या नव्या बदललेल्या अर्थानुसार, जुन्या कल्पनेप्रमाणें नव्हे ) स्वरूप प्रगट करतो. तेज या शब्दानें हा अभिप्रेत अर्थ स्पष्ट होतो. ' शक्ति ' या शब्दयोजनेनें तें साध्य होणार नाहीं. वास्तविक शक्ति हा तेजाचा गुणधर्म आहे. तेजाच्या अंगीं कार्यशक्ति असते. पदार्थविज्ञानांतील 'Power' या शब्दाचा ' शक्ति ' हा योग्य पर्याय होऊं शकेल. उदा० Horse-power = अश्वशक्ति.








करून दाखविलें कीं, कार्यशक्ति किंवा श्रम आणि तज्जन्य उष्णता यांच्यांत प्रमाणबद्ध नातें आहे. कार्यशक्तीच्या व्ययानें तितक्याच प्रमाणांत उष्णता निर्माण होते. या तत्त्वाच्या उलट, म्हणजे उष्णतेच्या व्ययानें तितक्याच प्रमाणांत कार्यनिर्मिति होऊं शकते हें तत्त्व ह्यूनामक शास्त्रज्ञानें १८५७ मध्यें सप्रयोग प्रस्थापित केलें. यापूर्वी गतिजन्य तेजा ( Mechanical Energy )-मुळेंच फक्त कार्यनिर्मिति होते असा समज होता. पण ज्या अर्थी उष्णतेमुळेंहि कार्यनिर्मिति होते ( उदा० वाफेचें एंजिन ) त्या अर्थी उष्णता हीहि एक प्रकारचें तेज ( Energy ) आहे असें सिद्ध झालें. उष्णतातेज आणि तज्जन्य कार्यनिर्मिति यांच्यांतील प्रमाणबद्धतेचें नातें दर्शविणारा नियम 'उष्णता-गतिशास्त्राचा पहिला नियम' म्हणून पदार्थविज्ञानांत प्रसिद्ध आहे.

एका प्रकारच्या तेजाचें दुसऱ्या प्रकारच्या तेजांत रूपांतर होतें हा नियम उष्णतातेजालाहि लागू आहे. घड्याळाच्या स्प्रिंगमधील सुप्त तेजा ( potential energy )चें गतिजन्य तेजांत रूपांतर झाल्यामुळें घड्याळ चालतें. धरणांतील पाण्याच्या सुप्त तेजाचें गतिजन्य तेजांत रूपांतर होऊन त्यायोगें विद्युत्तेज निर्माण होतें. विजेच्या दिव्यांत विद्युत्तेजाचें उष्णतातेजांत रूपांतर झालेलें आपण पाहातों. उष्णतातेजाचें गतिजन्य तेजांत रूपांतर झाल्यामुळें एंजिन चालतें. पेट्रोल व हवा यांच्या मिश्रणापासून उत्पन्न होणाऱ्या रासायनिक तेजा-(chemical energy )चें उष्णतातेजांत तसेंच गतिजन्य तेजांत रूपांतर होतें.तेजाचें रूपांतर होतें हा नियम जसा उष्णतातेजास लागू आहे तसाच तेज हें अविनाशी आहे (Conservation of Energy) हा नियमहि उष्णतातेजास लागू आहे. तेजाची नवनिर्मिति होऊं शकत नाहीं किंवा तें नष्टहि करतां येत नाहीं असा तो नियम आहे. घड्याळाच्या स्प्रिंगमधील सुप्त तेजाचें लंबकाच्या गतिजन्य तेजांत, तसेंच लंबकाच्या घर्षणामुळें निर्माण होणाऱ्या उष्णतातेजांत रूपांतर झालें तरी या भिन्नभिन्न तेजांचें एकंदर प्रमाण मूळ तेजाइतकेंच कायम राहतें; रूपांतरामुळें त्यांत बदल होत नाहीं.

तेजाचें रूपांतर होणें व तेज अविनाशी राहणें हे नियम उष्णतातेजास लागू असले तरी, उष्णतातेजाबाबत एक विशिष्ट प्रवृत्ति आढळून येते. इतर तेजांची सर्वसाधारणपणें उष्णतातेजांत रूपांतर होण्याची प्रवृत्ति असते. आणि रूपांतरामुळें कार्यनिर्मितीच्या दृष्टीनें उष्णतातेजाची उपयुक्तता कमी होत असते. उदाहरणार्थ, मोटारीच्या एंजिनमध्यें पेट्रोल व हवा यांच्या मिश्रणापासून उत्पन्न होणाऱ्या रासायनिक तेजाचें उष्णता व दाब यांत रूपांतर होतें आणि मोटारीला गति मिळते. मोटारीचे ब्रेक व इतर भाग तापतात. पण ब्रेक व इतर भागांतील उष्णतातेज एकत्र गोळा करून त्याचा फिरून पेट्रोल व हवा यांचें मिश्रण तयार करण्याकरितां उपयोग करावयाचा म्हटलें तर तें शक्य नसतें. याचें कारण असें कीं, पदार्थविज्ञानांत दोन प्रकारच्या मूलगामी प्रवृत्ती आढळून आल्या आहेत. एक एकमार्गी प्रवृत्ति ( Irreversible Process ) आणि दुसरी उलटसुलट जाणारी उभयमार्गी प्रवृत्ति ( Reversible Process ). गुरुत्वाकर्षण ( उदा०—जोडलेल्या दोन नळ्यांतील पाण्याची पातळी वर-खालीं होणें ), लंबकाचे हेलकावे, गर्तीतून गति निर्माण होणें, विद्युत्-लहरी आणि नादलहरींचे हेलकावे, या उभयमार्गी प्रवृत्ती होत. उष्णतातेज व विद्युत्तेज यांचा प्रवाह ही एकमार्गी प्रवृत्ति आहे. उष्णताप्रवाहाचा अनुक्रम मागें उलटा फिरवितां येत नाहीं. उष्णतातेज कार्यनिर्मितीच्या दृष्टीनें सारखें क्षय पावत आहे. उष्ण वस्तू थंड होत आहेत आणि या थंड वस्तू आणखी थंड होत आहेत. लाल तापलेला लोहगोल खोलींत उघड्यावर ठेवल्यास तो पूर्वीपेक्षां थंड होईल आणि भोंवतालच्या हवेचें उष्णतामान ( temperature ) वाढेल. पण या उलट क्रिया घडणें म्हणजे लोहगोल अधिक तापणें व भोंवतालच्या हवेचें उष्णतामान कमी होणें, संभवनीय नसतें.

उष्णतातेजाच्या प्रवृत्तीचा हा अनुभव लक्षांत घेऊन अगदीं प्रथम क्लॉशियस व केलविन या शास्त्रज्ञांनीं तो नियमरूपानें पद्धतशीरपणें मांडला. 'उष्णता-गतिशास्त्राचा दुसरा नियम' ( Second Law of Thermo-dynamics ) या नांवानें







तो सुप्रसिद्ध आहे. हा नियम मुळांत असा आहे :

" बाहेरील कोणत्याहि शक्तीची वा साधनाची मदत नसलेल्या कोणत्याहि स्वयंकर्तृत्वयुक्त ( self-acting ) यंत्रास, एका पदार्थातून दुसऱ्या अधिक उष्णतामान असलेल्या पदार्थात उष्णता वाहून नेणें अशक्य आहे; थोडक्यांत उष्णता थंड पदार्थातून उष्ण पदार्थात स्वयमेव जात नाहीं. "

क्लाशियस यांनीं उष्णतातेजाच्या प्रवृत्तीचें वैशिष्ट्य अगदीं प्रथम नियमरूपानें सांगितलें हें खरें; पण, हा ' उष्णता-गतिशास्त्राचा दुसरा नियम ' आणि उष्णतेची गतिशास्त्रीय उपपत्ति ( Kinetic Theory of Heat ) यांचा संबंध काय, या विशिष्ट प्रवृत्तीचा कार्यकारणभाव काय आणि अर्थ काय, या गोष्टींची मीमांसा त्यांनीं केलेली नव्हती. पुढें बोल्झमान या शास्त्रज्ञानें उष्णतातेजाच्या गतिशास्त्रीय उपपत्तीच्या आधारें ' उष्णता-गतिशास्त्राच्या दुसऱ्या नियमा ' चें विवरण करून जो अर्थ सांगितला व कार्यकारणभावाचा उलगडा केला, त्यामुळेंच या नियमाला ऐतिहासिक व तत्त्वज्ञानात्मक महत्त्व प्राप्त झालेलें आहे. बोल्झमान यांची मीमांसा अशी :

उष्णतातेजाच्या गतिशास्त्रीय उपपत्त्यनुसार पदार्थाचें उष्णतातेज हें त्या पदार्थाच्या अणु-परमाणूंच्या सरासरी गतिमाना-( Velocity )वर अवलंबून असतें. परमाणूंचें सरासरी गतिजन्य तेज ( Kinetic Energy ) हें त्या पदार्थाचें उष्णतामान ( temperature ) दर्शवितें. भिन्न भिन्न उष्णतामानाच्या, म्हणजेच परमाणूंचें भिन्न भिन्न गतिजन्य तेज असलेल्या वस्तू एकत्र आणल्यानें, इतस्ततः भ्रमण करणाऱ्या परमाणूंच्या परस्पराघातामुळें एकंदर गतिजन्य तेजांत समतोलपणा येण्याकडे रोख असतो आणि भिन्न भिन्न वस्तूंच्या उष्णतामानाचें भिन्नत्व नष्ट होण्याची प्रवृत्ति वाढते. या क्रमाची परिणति शेवटीं उष्णतेचा समतोलपणा ( Thermal Equilibrium ) होण्याकडे होत असते. उष्णतेच्या समतोलपणाची दिशा निश्चित करण्याचें जें संख्यात्मक प्रमाण आहे त्यास शास्त्रीय परिभाषेंत उष्णता सम होण्याची प्रवृत्ति ( Entropy ) असें म्हटलें आहे. ही प्रवृत्ति एखादी अमूर्त, अस्पष्ट कल्पना नसून उष्णतामान, लांबी, वजन, यांच्याप्रमाणें तीहि मोजतां येते. ती निश्चित करणारें समीकरण बोल्झमान यांनीं गणितशास्त्राधारें मांडलें आहे :

$$\text{Entropy} = k \log D$$

यांत ' $k$ ' हा बोल्झमान स्थिरमूल्यांक ( Boltzman Constant ) असून, त्याचें मूल्य ३.२९८ × १०<sup></sup>$^{-२४}$ Calories/°c इतकें आहे. ' D ' हें वस्तूंतील परमाणूंच्या विघटने-( Disorganisation or disorder ) चें विस्कळितपणाचें प्रमाण दर्शवितें.

बोल्झमान यांची वरील मीमांसा शास्त्रीय परिभाषेंत असल्यामुळें विषय आकलन होणें जरा कठीण आहे. पण, ' औष्णिक गतिशास्त्राच्या दुसऱ्या नियमा 'चा बोल्झमानपुरस्कृत अर्थ व कार्यकारणभाव यांचें सर आर्थर एडिंग्टन यांनीं आपल्या रूपकात्मक वर्णनशैलीनें केलेलें विवेचन सुबोध असून विषय समजणें त्यामुळें जरा सोपें झालें आहे. म्हणून तें संक्षेपानें पुढें दिलें आहे.

बोल्झमान यांच्या उपपत्तीचें स्पष्टीकरण करतांना एडिंग्टन यांनीं पत्त्यांच्या जोडाचें उदाहरण घेतलें आहे. एक्का, राजा, राणी अशा पद्धतशीर ठराविक अनुक्रमानें लावलेला पत्त्यांचा जोड घ्या. हा जोड पिसावयास सुरुवात केली असतां थोड्याच अवधीनंतर मूळ अनुक्रम विसकटला जातो. जसजसें अधिक पिसत जावें तसतसा अनुक्रम विसकटत जातो आणि प्रारंभींचा एक्का, राजा, राणी असा लावलेला अनुक्रम त्या पत्त्यांच्या जोडास प्राप्त होणें सुतराम् संभवनीय नसतें. एखाद्या माकडानें टाइपराइटरवर टाइपिंग करण्यास सुरुवात केली तर 'हॅम्लेट' नाटक टाइप केलें जाण्याचा जेवढा संभव तेवढाच त्या पत्त्यांच्या जोडास प्रारंभींचा अनुक्रम प्राप्त होणें संभवनीय असतें. कोणत्या तरी उपटसुंभ घटका-( random element )च्या आगमनामुळें विकृति उत्पन्न होते व पूर्वीच्या सुसंघटितपणाच्या ठिकाणीं सतत वाढणारा विस्कळितपणा निर्माण होतो. विश्वांतील उष्णतातेजाला क्षय लागण्याचें आणि कार्यक्षमतेच्या दृष्टीनें त्याची उपयुक्तता कमी होण्याचें कारण असेंच बेताल व आगंतुक आहे.

उदाहरणार्थ, उंचीवरून जेव्हां एखादा दगड खालीं येतो, तेव्हां त्याला गतिजन्य तेज ( Kinetic Energy ) प्राप्त होतें आणि त्या दगडास मूळच्या उंचीवर फिरून नेण्यास जेवढें गतिजन्य तेज लागतें तेवढेंच तें असतें. पण तो दगड जमिनीवर येऊन आदळल्यास मात्र गतिजन्य तेजाचें उष्णतातेजांत रूपांतर होतें; आणि भिन्न प्रकारच्या एकंदर तेजांचें संख्यात्मक प्रमाण पूर्वीप्रमाणें कायम असून देखील तें सारें तेज गोळा करून एंजिनमध्यें भरून त्या एंजिनच्या साहाय्यानें तो दगड मूळ उंचीवर नेण्याचा प्रयत्न केला तरी तें शक्य नसतें. तेजाची पूर्वीची कार्यक्षमता नष्ट होण्याचें कारण काय? त्याची कारणमीमांसा अशी : उंचीवरून दगड खालीं पडूं लागतो तेव्हां बोल्झमानच्या उपपत्त्यनुसार दगडांतील असंख्य अणु-परमाणू समांतर आणि सारख्याच गतीनें शिस्तींत आगेकूच करणाऱ्या पलटणींसारखे खालीं येत असतात. यावरून त्या दगडाच्या गतीसंबंधीं दोन विशेष महत्त्वाचे मुद्दे लक्षांत घेणें जरूर आहे. एक मुद्दा म्हणजे खालीं येणाऱ्या दगडाचें गतिजन्य तेज आणि दुसरा म्हणजे त्या तेजाचें सुसंघटित शिस्तबद्ध स्वरूप. या दोन गोष्टी जशाच्या तशा टिकविल्यास तो दगड विनासायास मूळ ठिकाणीं जाऊं शकेल. उदाहरणार्थ, योग्य व आदर्श स्थितिस्थापकत्व असलेल्या ( Elastic ) पृष्ठभागावर तो दगड येऊन पडला तर परमाणूंची संघटना विसकटणार नाहीं आणि तो मूळच्या उंचीवर परत मागें सहजगत्या जाऊं शकेल; प्रत्येक परमाणु पूर्वीच्याच शिस्तीनें मागें फिरेल. पण हें असें घडण्याचा सुतराम् संभव नसतो. जें कांहीं घडतें तें असें कीं, दगड खालीं जमिनीवर पडल्यावर त्याचे परमाणु परस्पराघातामुळें धक्के खात भ्रमिष्टासारखे सैरावैरा भ्रमण करूं लागतात. त्यांची मुळांतली शिस्तबद्ध आगेकूच व सुसंघटना मोडकळीस येते. फिरून त्यांच्यांत एकवाक्यता, शिस्त निर्माण होणें असंभवनीय असतें. पत्ते जितके पिसावे तितका त्यांतील विस्कळितपणा वाढत असतो. म्हणूनच एकंदर तेजाचें प्रमाण पूर्ववत् कायम असलें तरी, गतिजन्य तेज आणि तेजाचा सुसंघटितपणा यांच्यापैकीं एक म्हणजे संघटनात्मक घटक नष्ट झाल्यानें बाहेरील साधनाशिवाय दगड उचलला जात नाहीं आणि तेजाची कार्यक्षमतेच्या दृष्टीनें उपयुक्तता कमी होते.

तेजाचा हा विस्कळितपणा सतत वाढविणारा जो बेताल घटक ( random element ), तो निश्चित करण्याचें जें व्यावहारिक प्रमाणसाधन त्यासच ‘ उष्णता सारखी होण्याकडे प्रवृत्ति’ ( Entropy ) असें म्हणतात. ह्या प्रवृत्तीचा रोख अव्याहत वृद्धिंगत होण्याकडे असतो हें वरील विवेचनावरून सहज समजण्यासारखें आहे. “ Entropy चा रोख नेहमीं उच्चतम मूल्यांकाप्रत असतो ”—या प्रगत स्वरूपांत क्लॉशियसप्रणीत ‘ उष्णतागतिशास्त्राचा दुसरा नियम ’ मांडण्यांत आला आहे. उष्णतामान जितकें कमी तितका सुसंघटितपणा कमी, म्हणजेच विस्कळितपणा अधिक. मॅक्सवेलनामक शास्त्रज्ञाच्या व्याख्येनुसार Entropy ही प्रवृत्ति हा पदार्थाचा एक गुणधर्म आहे आणि तो लाक्षणिक रूपानें प्रदर्शित करतां येतो. उदाहरणार्थ, ज्या वेळीं पदार्थाची उष्णता ग्रहण करण्याची शक्ति तशीच उष्णता द्यावयाची शक्ति नष्ट होते, त्या वेळीं त्या पदार्थाची उष्णता सम होण्याची प्रवृत्ति स्थिरमूल्यांकरूप ( constant ) असते; ज्या वेळीं तो पदार्थ उष्णता ग्रहण करूं शकतो त्या वेळीं ती वाढत असते आणि जेव्हां तो उष्णता देऊं शकतो त्या वेळीं ती क्षय पावत असते.

Entropy या प्रवृत्तीमुळें विश्वसंघटन व कालप्रवाहाची दिशा यांसंबंधींच्या ज्ञानाचें एक नवीन दालन खुलें झालें आहे. विश्वतेजाच्या संघटनेच्या स्वरूपाचें परीक्षण करून कालप्रवाहाची दिशा निश्चित करतां येणें शक्य झालें आहे. भूत आणि भविष्य यांमधील भेद स्पष्टपणें निश्चित करणारा ‘ उष्णतागतिशास्त्राच्या दुसरा नियम ’ याशिवाय इतर कोणताच निसर्गनियम नाहीं.

उष्णता सम होण्याच्या या नियमानुसार शेवटीं अशी एक स्थिति प्राप्त होईल कीं, ह्या स्थितीप्रत पोहोंचतांच विश्वांतील एकंदर उष्णतातेज समानत्वानें विभागलें जाईल. उष्णतादान व उष्णताग्रहण या दोन्ही घटना अशक्य ठरतील. विश्वांतील वस्तूंचें उष्णतामान सर्वत्र समान असेल व तें इतकें



अनुक्रमणिका








खालीं उतरलेलें असेल कीं त्यापेक्षां तें खालीं जाणें शक्यच नसेल. प्रेताप्रमाणें विश्व थंड पडेल. विश्वाचा 'उष्णताजन्य मृत्यु' ( Heat-death ) ओढवेल. म्हणजे प्रखर उष्णतेमुळें विश्वाचें भस्म होईल असा अर्थ नव्हे. उलट, उष्णतेच्या अभावामुळेंच हें घडेल. उष्णतामानाचा पारा खालीं जाण्याची परिसीमा ठरल्यामुळें उष्णतामान सर्वत्र समान होईल. उष्णतातेजाची कार्यक्षमताच नष्ट झाल्या कारणानें सार्‍या निसर्गक्रिया थांबतील. जीव, प्रकाश वगैरे सार्‍यांचें अस्तित्वच नष्ट होईल. विश्वांत कायम टिकणारी शाश्वत अगतिकता ( Stagnation ) निर्माण होईल. म्हणून Entropy ही प्रवृत्ति कालप्रवाहाची दिशा दर्शविते; ती परमोच्च स्थितीस पोहोंचतांच तिची प्रगति थंड पडेल; अर्थात्, कालाचीहि परिसमाप्ति होईल.[२] ब्रह्मदेव जरी आडवा आला तरी विश्वाचें हें विधिलिखित टळण्याचा संभव नाहीं. कारण, उष्णतागतिशास्त्राच्या दुसर्‍या नियमानुसार निसर्गाचा हा मूलभूत गतिक्रम एकमार्गी असल्यानें तो उलट फिरवितां येत नाहीं.

या उलट कांहीं शास्त्रज्ञांनीं विश्वाच्या भवितव्याविषयीं आशादायक विचारसरणी व्यक्त केली आहे : ब्रिटिश विश्वोत्पत्तिशास्त्रज्ञ फ्रेड हॉयिल यांनीं 'विश्वाच्या निरंतर निर्मितीचा' सिद्धान्त पुरस्कृत केला आहे. त्यांच्या मतें प्रत्येक महापद्म वर्षास एक क्वार्ट अवकाशांत एक हायड्रोजन अणूची भर टाकावयास हवी म्हणजे विश्वाची 'निरंतर निर्मिति' होत राहील; आणि हायड्रोजन अणूची अशा तर्‍हेची निर्मिति होणें शक्य आहे व ती होत असावी. विश्वक्षयाचें भकास व भयाण भवितव्य लक्षांत घेतां हॉयिलचा सिद्धान्त हा एक आशाकिरण मानण्यास कांहींच हरकत नाहीं.

दुसरे एक शास्त्रज्ञ मिलिकन यांचा सिद्धान्त असा आहे कीं, अतिदूर अवकाशांत निर्माण होत असलेले विश्वकिरण ( Cosmic Rays ) विश्वनिर्मितीचें कार्य अखंडपणें चालूंच ठेवतात. पण यासंबंधीं अजून प्रत्यक्ष पुरावा उपलब्ध नाहीं. विश्वकिरणांसंबंधीं अजून खूपच संशोधन व्हावयाचें आहे. त्यांच्याविषयींच्या ज्ञानानें विज्ञान-तत्त्वज्ञानांत अपूर्व क्रांति घडून येईल असें वाटण्यास जागा आहे.

---

२. लॉर्ड बायरन या कवीच्या कविमनाला या उदास, भकास, भयंकर विश्वघटनेचा साक्षात्कार झाला असावा ! 'DARKNESS' या त्याच्या कवितेंतील पुढील काव्यपंक्ती खरोखरच उद्बोधक आहेत :

"......................The world was void,
The populous and the powerful was a lump
Seasonless, herbless, treeless, manless, lifeless,
A lump of death — a chaos of hard clay.
The rivers, lakes and ocean all stood still,
And nothing stirred within their silent depths;
Ships sailorless lay rolling on the sea,
The waves were dead, the tides were in their grave,
The moon, their mistress, had expired before,
The winds were withered in the stagnant air,
And the clouds perished; Darkness had no need
Of aid from them — She was the Universe."



अनुक्रमणिका






आचार्य विनोबा यांचे विचार : संग्राहक–श्री. श्रीनिवास नखाते

# स्त्रियांच्या शिक्षणाचें स्वरूप

## जीवनाचे दोन खंड पाडणें अनिष्ट

स्त्रिया आणि पुरुष यांच्या शिक्षणांत कांहीं भाग समान असतो व कांहीं स्वतंत्र भागहि असतो. परंतु समान भाग बराच असतो आणि स्वतंत्र असा अंश कमी आहे. प्रथम आपण त्यांच्यांतील समान अंशाचा विचार करूं.

स्त्री आणि पुरुष या दोघांचींहि मनें संस्कारक्षम आहेत. त्याबाबत दोघांतहि कांहीं अन्तर नाहीं. क्षुधा-तृष्णाआदि मूलभूत प्रवृत्तीहि दोघांच्या ठायीं सारख्याच आहेत. सृष्टीशीं दोघांचे संबंध एकाच स्वरूपाचे आहेत. एकाला एक प्रकारें दिसतें व दुसऱ्याला दुसऱ्या प्रकारें, असें होत नाहीं.

यावरून स्त्री-पुरुषांच्या शिक्षणांत बराच भाग समान आहे हें सिद्ध होतें. गुणविकासाचे नियमहि दोघांनाहि सारख्याच तऱ्हेनें लागू होतात. हें ध्यानीं घेऊनच मी असें म्हणतों कीं, दोघांना सारखें व सहशिक्षणच मिळावयास हवें.

सहशिक्षण हें उचित आहे काय असें लोक मला विचारतात. हा प्रश्न उद्भवतो कसा, हेंच मला कळत नाहीं. प्रत्यक्ष परमेश्वरानेंच या प्रश्नाचें उत्तर देऊन ठेवलें आहे. परमेश्वराला सहशिक्षण संमत नसतें तर त्यानें कांहीं घरांत फक्त मुलगे व कांहीं घरांत फक्त मुलीच दिल्या असत्या. परंतु त्यानें बहुतेक सर्व घरांतून दोन्हींहि दिलीं आहेत. यावरून आपलें शिक्षण एकत्रच असावयास पाहिजे हें ईश्वरी संकेतास अनुसरूनच आहे हें ध्यानीं येईल. शिक्षणाबाबत दोघांनाहि समान संधि द्यावयास हवी. मग ते आपआपल्या योग्यतेनुसार शिक्षण प्राप्त करून घेतील. कृत्रिम उपायांनीं मुलामुलींना अलग ठेवून त्यांचा विकास होणें शक्य नाहीं. तसें करण्यानें विकारवशता वाढेल अथवा अतिरिक्त एकांगी शिक्षण होईल.

स्त्री-पुरुषांच्या शिक्षणांत स्वतंत्र, प्रत्येकाचा निराळा असा भाग फार नाहीं. फरक आहे तो नंतरच्या आचारांत आहे. शारीरिक भेदामुळें स्त्री व पुरुष यांचीं कांहीं कामें भिन्न आहेत एवढेंच. परंतु आज ज्याप्रमाणें स्त्री व पुरुष यांचीं कामें अलग अलग मानलीं जातात त्याप्रमाणें पुढेंहि तीं मानलीं जावींत असा माझा आशय नाहीं.

उदाहरणार्थ, स्वयंपाकाचें काम घ्या. साधारणतः स्त्रियाच स्वयंपाकाचें काम करतात. परंतु स्वयंपाक हें स्त्रियांचेंच काम मानलें जावें असें होतां कामा नये. स्वयंपाकाच्या कामांत पुरुषांनींहि प्रवीण बनावयास हवें. स्वयंपाक हें उत्पादक काम आहे. त्यांत तसें कांहीं नवें उत्पादन केलें जातें असें नाहीं. नवें उत्पादन परमेश्वरच करतो. मनुष्य फक्त रूपांतरच करतो. उदाहरणार्थ, गव्हाची रोटी, लांकडापासून टेबल किंवा कापसापासून कापड. परंतु स्वयंपाक ही अखेरची क्रिया होय. अखेरच्या क्रियेंत चूक चालत नाहीं. प्रारंभींच्या क्रियांतून चूक झाली तर नुकसान फार थोडें होतें. परंतु अखेरच्या क्रियेंत चूक झाली तर अधिक हानि होते. सुसंपूर्ण, दोषरहित अशा स्वयंपाकाच्या कामापासून मुलांना वंचित ठेवणें उचित आहे का?–हा त्यांच्यावर अन्याय होय. अशा तऱ्हेनें मुलें व मुली यांचीं कामें आपण अगदीं अलग बनवूं तर समाजाचे तुकडे तुकडे होतील व समाजाचें एक अंग निव्वळ भारभूत बनेल. मुलांना या कामाचा वीट, तिटकारा असतां

---

' सर्वोदया 'च्या ऑक्टोबर १९५२ च्या अंकावरून संगृहीत.

कामा नये. स्वयंपाकाची प्रमुख जबाबदारी स्त्रियांची होय, हें मी मानतों. परंतु तें फक्त त्यांचेंच काम, असें मानतां उपयोगी नाहीं. इतर कांहीं कामांतून स्त्री-पुरुषांच्या कामांतील प्राधान्यांत फरक पडेल. परंतु तेथेंहि जीवनाचे दोन खंड पाडून उपयोगी नाहीं. तसें केल्यास आत्मा खंडित होईल.

स्वयंपाक हें मीं फक्त उदाहरण म्हणून निर्दिष्ट केलें आहे. घरांतल्या सर्व कामांत पुरुषानें जरूर भाग घेतला पाहिजे. त्याचप्रमाणें बाहेरच्या कामांतहि स्त्रियांनीं हातभार लावला पाहिजे व त्यांना तशी संधि दिली गेली पाहिजे. दोघांच्या कार्यक्षेत्रांत अंतर आहे तें कोण कशावर अधिक जोर देतो ह्यासंबंधीं आहे.

शेती किंवा सुतारकाम स्त्रिया उत्तम प्रकारें करूं शकतात. आजकाल यंत्रांनीं ग्रामोद्योगावर, शहरांनीं खेड्यांवर आक्रमण केलें आहे. त्याप्रमाणें वरील क्षेत्रांत पुरुषांचें स्त्रियांवर एक प्रकारें आक्रमणच झालें आहे. विणण्याचा धंदा स्त्रिया उत्तम तऱ्हेनें करूं शकतात. आसाम किंवा गुजरात या प्रदेशांत आजहि स्त्रिया हा व्यवसाय करीत आहेत. इतर प्रांतांतहि स्त्रिया हें काम करतात. पण पुरुषांच्या सहायिका या नात्यानें. हा उद्योग प्रथम स्त्रियांनीं केला आहे. वेदांत विणणाऱ्या स्त्रियांचाच उल्लेख आहे. परंतु हा व्यवसायहि पुरुषांनीं त्यांच्याकडून हिरावून घेतला. स्त्रियांचीं शरीरें नाजूक असल्यामुळें लांकूड तोडणें, तासणें असलें काम त्या तासन् तास करूं शकणार नाहींत. शिवण्याचें कामहि पुरुषांनीं स्त्रियांच्या हातून हिसकावून घेतलें आहे. आजकाल स्वयंपाकाखेरीज त्यांचा असा धंदा त्यांच्याजवळ राहिला नाहीं. पुरुषांनीं स्त्रियांपासून जाणूनबुजून बुद्ध्याच हे धंदे हिरावून घेतले असें मी म्हणत नाहीं. समाजरचनेंत स्त्रियांना गौण स्थान मिळालें. कांहीं कलात्मक कामें स्त्रिया पुरुषांपेक्षां अधिक चांगल्या तऱ्हेनें करूं शकतात. चित्रकला, कताई, विणकाम आदि कलात्मक व सामाजिक कामें स्त्रियांकडून विशेष चांगल्या तऱ्हेनें होऊं शकतात. पुरुष यावर अधिक भर न देतील तर स्त्रिया त्या बाबत अधिक स्वावलंबी होतील.

बालसंगोपनादि कांहीं कांहीं कामें स्त्रियांचीं विशेष म्हणून सांगतां येतील. याहि विषयांत पुरुषांनाहि ज्ञान असणें अगत्याचें आहे. परंतु पालनपोषणाचें ज्ञान स्त्रीला अधिक असावयास हवें. बाकी सर्व शिक्षण सर्वसामान्य चालूं शकतें.

राष्ट्रसंरक्षणापर्यंतचीं सर्व कामें स्त्रिया करूं शकतात. आतांपर्यंत या बाबतींत हिंसेचा आश्रय घेतला जात होता. आणि स्त्रियांची शारीरिक शक्ति कमी असल्यामुळें त्यांना राष्ट्रसंरक्षणाच्या कामांत समाविष्ट केलें जात नव्हतें. परंतु अहिंसेचा नवा मार्ग निघाल्यानंतर हें क्षेत्रहि स्त्रियांना मोकळें झालें आहे. समाजरक्षण वगैरे कामांत स्त्रियांनीं अधिक भाग घ्यावयास हवा आहे. तेव्हांच जग हिंसेपासून वाचेल. पुरुषांच्या हातींच हें क्षेत्र राहिल्यानें द्वेष मात्र वाढला आहे. याहि क्षेत्रांत स्त्रिया व पुरुष यांचें स्थान बरोबरीचेंच असावयास हवें.

मुलांचें शिक्षण हें स्त्रियांचें एक विशेष क्षेत्र होय. उद्योगमूलक शिक्षण स्त्रियांच्याच हातीं असलें पाहिजे. सिंह, वाघ आदि प्राण्यांतहि संतानरक्षणाचा भार मादीवरच आहे असें दिसून येतें. स्त्रियाच आपल्या खाण्यासाठीं शिकार मिळवितात. या प्राण्यांतील वाईट गोष्टींचें अनुकरण आपण न करावें, पण चांगल्या गोष्टींचें अनुकरण करावयास कांहीं हरकत नाहीं ना? उपजीविका प्राप्त करून घेण्याच्या जबाबदारींतून स्त्रियांना मुक्त करण्याचें कांहीं कारण आहे असें वाटत नाहीं. परंतु स्त्रियांना आपलीं कामें करण्यास फुरसत मिळणें आवश्यक आहे. आज स्त्रियांना कमी मजुरी देण्याची जी प्रथा आहे ती सर्वस्वीं उलटी व अन्यायपूर्ण आहे.

## स्त्रियांचें चित्तैकाग्र्य

स्त्रियांत पुरुषांपेक्षां अधिक एकाग्रता असते. ही एक त्यांना दैवी देणगी आहे. ह्या गुणाशिवाय बालसंगोपन होऊंच शकत नाहीं. याच गुणामुळें ध्यानयोग व भक्तियोग यांना स्त्रियांची मनोऽवस्था अधिक अनुकूल असते. कर्मयोग व ज्ञानयोग हे पुरुषांच्या मनोप्रवृत्तीस अधिक अनुकूल होत. कर्मयोगांतहि ज्या गोष्टींत एकाग्रतेची अधिक जरूरी आहे अशा गोष्टी स्त्रिया अधिक कौशल्यानें








करूं शकतात. शेवटचा हात फिरविणें (finishing) ही गोष्ट स्त्रियाच अधिक चांगल्या तऱ्हेनें करूं शकतात. म्हणून स्त्रियांना अधिक पैसे मिळणें जरूर आहे असें माझें मत आहे. स्त्रियांना कमी मजुरी देणें हें मी अन्यायाचें समजतों. हा विषय राष्ट्रीय नियोजनाचा आहे. मी येथें त्याचा अधिक विस्तार करूं इच्छीत नाहीं.

ज्ञानसंपन्न तेजस्विनी

हिंदुस्थानांत स्त्रियांना ब्रह्मचर्याचा अधिकार नाहीं. इस्लाममध्येंहि तो नाहीं. ही आमची फार मोठी चूक आहे. स्त्रियांना ब्रह्मचर्याचा अधिकार रोमन कॅथॉलिक व जैन पंथांत आहे. हिंदुधर्मांत हा अधिकार कां ठेवण्यांत आला नाहीं हें मला माहीत नाहीं. वेदांत या निषेधास आधार मला कोठेंच आढळला नाहीं. नंतरच्या प्रवाहांत केव्हां तरी हा विचार हिंदुधर्मांत घुसला. आज अध्यात्माच्या प्राप्तीसाठीं स्त्रियांना ब्रह्मचर्याचा अधिकार नाहीं हें खरें. संन्यासाचाहि त्यांना अधिकार नाहीं. बऱ्याच स्त्रिया वैवाहिक जीवनाचाच स्वीकार करतील हें मला मान्य आहे. तसें मानलें तरी त्यांत कांहीं बिघडलें नाहीं. परंतु ब्रह्मचर्याबाबतचा प्रतिबंध हटविणें अगत्याचें आहे. हें तुमच्या-आमच्या अथवा कोणाच्या सांगण्यावरून होणार नाहीं. हा निर्बंध तोडणाऱ्या ज्ञानी स्त्रिया निघतील तेव्हांच तो नाहींसा होऊं शकेल. गांधीजींसारख्यांनींहि यासाठीं खूप प्रयत्न केले. पण त्यांनाहि या बाबतींत पुरेसें यश आलें नाहीं. पुरुष स्त्रियांवर उपकार करूं शकतील, परंतु त्यांचा उद्धार पुरुषांना कधींहि करतां येणार नाहीं. जेव्हां तेजस्विनी, ज्ञानसंपन्न, सरस्वतीसारखी एखादी स्त्री निर्माण होईल तेव्हांच आपल्या धर्मविचारांत हें परिवर्तन घडून येऊं शकेल. लहान वयांत संन्यास घेत नसत असा एक जमाना होता. शंकराचार्यांनीं ह्या सीमेचें उल्लंघन केलें. त्यांनीं आत्म्याच्या मुक्तीचा अधिकार स्थापित केला. त्याचप्रमाणें जर एखाद्या स्त्रीनें ह्या बंधनाच्या पलीकडे जावयाचें ठरविलें तर ती तसें करूं शकेल.

मुलींनीं शाळेंत जाऊन काय करावयाचें असें माझी आईहि म्हणत असे. स्त्रीची शाळा पतीचें घरच आहे. पतीच्या घरांतहि स्त्रियांचें पुष्कळ शिक्षण होतें. परंतु स्त्रियांनीं पुरुषांची सेवाच करावी हा विचार चुकीचाच आहे. आत्म्याच्या ठायीं लिंगभेद नाहीं.

मातृभावना हाहि एक मोठा सामाजिक आदर्श आहे हें ठीक आहे. त्याची योग्यता मी कमी समजत नाहीं. परंतु सीता-सावित्री आदि स्त्रिया आमच्यामध्यें आदर्श मानल्या जातात. त्यांच्या जीवनांत ब्रह्मचर्याच्या भावनेचें फार महत्त्व आहे. पुरुषांच्या जीवनांत ब्रह्मचर्याचें विशिष्ट असें स्थान आहे. ब्रह्मचारी पुरुष कोणा एखाद्या स्त्रीसाठीं आपलें जीवित अर्पण करीत नाहीं. तो परमेश्वराचें नांव घेत सर्व दुनियेचा संचार करीत असतो. ब्रह्मचर्याचा हाच आदर्श स्त्रियांच्या ठायीं असावयास पाहिजे. मीराबाईचा आदर्श आमच्यासमोर आहेच. परंतु तिला—

> ‘ लोग कहे, मीरा भओ बावरी
> बाप कहे कुलनासी रे । ’

(‘ लोक म्हणतात, मीरा पागल बनली आणि बाप म्हणतो मीरा कुलनाशिनी झाली ’) लोकांनीं तिला हरीच्या मागें लागलेली वेडी मानलें. या अलौकिक व अद्वितीय उदाहरणानें स्त्रियांना स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याच्या कामीं कांहीं साहाय्य झालेलें नाहीं. मीराबाईच्या उदाहरणाचें कोणीं अनुकरण केलेलें नाहीं.

स्त्रियांनाहि ब्रह्मचर्य, संन्यास, वेदाभ्यास, आत्मचिंतन इत्यादि बाबतींत स्वतंत्र अधिकार असणें अवश्य आहे. हें नसल्यामुळें आमच्या प्रगतीच्या मार्गांत अनेक अडथळे आले आहेत. हिंदुधर्मांत स्त्रियांना वैधव्याच्या ब्रह्मचर्याचा अधिकार देण्यांत आला आहे. परंतु त्यायोगें स्त्रियांचा उद्धार होणें शक्य नाहीं. ती अवशता किंवा लाचारी आहे.

स्त्रियांमध्यें वात्सल्यभाव सहज आहे. त्या माता झाल्या तर मी त्यांना दोष देणार नाहीं. उलट, त्यांचें गुणगानच करीन. परंतु जर एखाद्या स्त्रीनें ब्रह्मचारिणी राहावयाचें ठरविलें तर तिला गौण कां मानावें ? कन्येला ‘ परकीय अर्थ ’ मानून दुसऱ्याच्या घरीं पाठविण्याची प्रवृत्ति मला केव्हांहि बरी वाटत नाहीं.







एका अमेरिकन साहित्यिकाचे अनुभवाचे बोल : संग्राहक—प्रा. दे. अ. दाभोलकर

# जीवनांतील सुरक्षितता आणि कलाजीवन • •

'The Glass Menagerie' या माझ्या नाटकाला अभूतपूर्व यश मिळालं. आजवर माझं नांव कुणाला माहीतहि नव्हतं. आतां तें अनेकांच्या ओठांवर नाचूं लागलं. माझ्या बाह्य परिस्थितींतहि जमीन-अस्मानाचा फरक पडला. कुठें तरी एक-दोन खोल्या भाड्यानें घेऊन राहणारा मी, आतां दिवसाला ५०० रुपये आकार घेणाऱ्या एका विलासी राजेशाही हॉटेलांत जागा घेऊन राहूं लागलों होतों.

एखाद्याला अचानक पैसा किंवा प्रसिद्धि मिळाली तर अमेरिकेंत त्याचं कोणाला विशेष कांहीं वाटत नाहीं. अशा गोष्टी या देशांत वारंवार घडत असतात. मला स्वतःलाहि या बदलाचं विशेष कांहींच वाटलं नाहीं, असं सांगितलं तर तें दांभिकपणाचं ठरेल. परंतु मला त्याविषयीं कांहीं सांगायचंच नाहीं. या बाह्य जीवनाचा माझ्या कलाजीवनावर जो प्रचंड परिणाम झाला त्याचंच मला मोठं आश्चर्य वाटलं.

आतां माझ्या जीवनांत सुखासीन सुखवस्तूपणाचा शिरकाव झाला होता. दररोजची दुपार कशी टळेल ही चिन्ता माझ्यासमोर नव्हती. या नंतरहि अशी चिन्ता कधींहि करावी लागणार नाहीं इतकं आर्थिक स्वास्थ्यहि मला प्राप्त झालेलं होतं. आजवर जीवनाच्या प्रत्येक क्षणीं मला मानवाच्या मूलभूत गरजांसाठीं झगडावं लागलं होतं. असं झगडतां झगडतां मला कलेची जेवढी कांहीं सेवा करता आली तेवढीच काय ती मीं केली होती. एखाद्या निसरड्या दरडीवर प्राणपणानें एकेक पाऊल रोखून तसूतसूनें वर चढण्याचा प्रयत्न करावा तसा माझा जीवनाशीं झगडा सुरू होता. आज चढण संपली आहे. वरच्या सुरक्षित सपाटीवर मी येऊन पोहोंचलों आहे. आतां यापुढें येथील सुखद, शीतल वारा निरन्तर मला जीवनसाथ देणार आहे.

वर चढून आल्यानंतर कांहीं काल मला बरं वाटलं. परंतु कांहीं कालच. मानवाच्या सर्व शक्ती जीवनकलहांत उपयोगी आणण्यासाठींच त्याला मिळालेल्या असतात. या संग्रामांतच त्यांचा कस लागतो व त्यांना अधिकाधिक धार चढते. जीवनांत सुरक्षितता आली कीं या शक्तीचा वापर करण्यास कारण पडत नाहीं. हळूहळू त्या बोथट होतात. नंतर गंजूनहि जातात. माझंहि असंच होऊं लागलं. माझ्यांतील सृजनशक्ति आटत आहे असं मला दिसून येऊं लागलं. मी माझ्यावर आणि येणाऱ्या-जाणाऱ्यांवर चिडूं लागलों. संभाषणाचा कोणताहि विषय काढला तरी मला विलक्षण उबग येत असे. सभोंवतालचे सगळे लोक दांभिक आहेत असं वाटे. कधीं काळीं रेकॉर्ड केलेल्या संभाषणाच्या त्याच त्याच तबकड्या आपण पुनःपुन्हां वाजवीत आहोंत असं वाटून येथून दूर कुठें तरी पळून जावं असं मनांत येई. त्याच त्याच निःसत्त्व स्तुतिवचनांची मला अगदीं शिसारी आली होती. माझ्या जीवनांतून मुख्य प्राणतत्त्व निघून गेलेलं आहे आणि माझ्या साऱ्या हालचाली एखाद्या कळसूत्री बाहुल्याप्रमाणें होत आहेत, एवढी एकच जिवन्त जाणीव मला पुनःपुन्हां टोंचीत होती !

या साऱ्यांतून बाहेर पडावं म्हणून डोळ्याच्या ऑपरेशनचं निमित्त करून मीं हॉस्पिटलच्या

---

सुप्रसिद्ध अमेरिकन साहित्यिक टेनेसी विलिअम्स याचें 'A Streetcar Named Desire' हें नाटक अत्यंत प्रसिद्ध आहे. हें नाटक न्यू यॉर्कमध्यें रंगभूमीवर येण्याच्या कांहीं दिवस आधीं (३०-११-४७) टेनेसी विलिअम्स यानें 'दि न्यू यॉर्क टाइम्स'च्या नाट्य-विभागांत एक लेख लिहिला. त्यावरून मुक्तपणें प्रस्तुत विचार संकलित केले आहेत. हा लेख नाटकाच्या 'सिग्नेट बुक' आवृत्तीच्या सुरुवातीला जोडलेला आहे.—लेखक










एकान्तवासांत तीन महिने काढले. या कालांत माझ्या मनाला कांहींसा विसावा मिळाला. हॉस्पिटल्मध्यें भेटावयास येणाऱ्या मित्रमंडळींच्या स्नेहशील पूसतपासांत मला त्यांच्या पूर्वीच्याच सौजन्याच्या स्नेहार्द्रतेचा दिलासा मिळूं लागला. पुन्हां माझ्या मनाला टवटवी येऊं लागली. माझा डोळा पूर्ण बरा झाल्यानंतर मीं त्या राजेशाही हॉटेलला रामराम ठोकला आणि मेक्सिकोची वाट धरली. या देशाला अजून आधुनिक संस्कृति व उथळ औपचारिकता यांची बाधा झालेली नाहीं. माझ्या मोठेपणाची येथें प्रतिपदीं आठवण होण्याचं कांहीं कारण नव्हतं. एक सामान्य माणूस म्हणून जगणं येथें मला शक्य होतं.

आणि यानंतर मीं माझं ' A Streetcar named Desire' हें नाटक लिहावयास घेतलं. कलेच्या उपासनेंतच कलावन्ताला अखेर खरा दिलासा मिळूं शकतो. उत्कटता कलावस्तूंत किती केंद्रित असते ! या उलट दैनंदिन जीवन किती ओबडधोबड, अव्यवस्थित, किती बेंगरूळ ! परंतु कलानिर्मितीहि ती करावयाची म्हणून होत नाहीं. त्याकरितां तशी आंतरिक अनिवार ऊर्मीच यावी लागते.

आतांहि माझ्या जीवनांत असुरक्षितता, झगडा, संग्राम निर्माण झाला होता असं नव्हे. ते धकाधकीचे, असुरक्षिततेचे दिवस गेले ते कायमचे गेले. नियतीचीं चक्रं उलट फिरवणं माझ्या हातांत नव्हतं. परंतु सुरक्षिततेमुळें उत्कट कलाजीवनाला कसा धोका निर्माण होतो एवढं लक्षांत आलं तरीहि पुष्कळच काम भागतं. शत्रूचा हल्ला कोठून येणार आहे हें आगाऊ माहीत असलं कीं तशी तयारी करता येते.

सुरक्षितता हें कलाकाराचं मरण आहे. अति पैसा व प्रसिद्धि या दोन्ही गोष्टी कलेला मारक आहेत. जागतिक यशापयशापेक्षां आपल्या विकासी व्यक्तिमत्त्वाचा ठसा उमटलेलं आपलं कलाजीवन हें अनन्त पटींनीं अधिक महत्त्वाचं आहे हें ज्यांनीं ओळखलं, असे लोकच अकल्पित यशाचे आघात रिचवूनहि आपलं कलाजीवन सांभाळूं शकतील. हें जीवन हेंच एक कलाकारापुरतं सत्य आहे. जागतिक यशापयश हा सारा मायेचा पसारा आहे. या मायेच्या जंजाळांत न सांपडतां जीवनसत्याशीं एकनिष्ठ राहण्याची जागरूकता कलाकारानें दाखविली पाहिजे.

कलावन्ताचें ध्येय तें हेंच. जातीच्या कलावन्ताला—मग तो कोणत्याहि कलेचा उपासक असो—एकच ध्येय असूं शकतं. मानवाच्या मनाचा, मानवापुढील समस्यांचा वेध घेणं व त्यावर कलेचा सत्यस्निग्ध प्रकाश टाकणं हेंच तें ध्येय होय. अन्तःकरणाची शुचिता हेंच जीवनांतील सर्वोच्च साध्य आहे असं विल्यम सारोयाननें आपल्या एका नाटकांत प्रतिपादिलं आहे. खऱ्या अर्थानं जीवन जगायचं असेल तर प्रतिक्षणीं जागरूक राहिलं पाहिजे. अगदीं या क्षणापासून—मी हीं अक्षरं लिहीत आहे आणि तुम्ही वाचीत आहांत त्या क्षणापासून. कालाचा इषारा तर अविरत चालूंच आहे. ' टिक् टिक् टिक् हें घड्याळ बोले—आला क्षण, गेला क्षण! '

---

## पुस्तक - परामर्श

# ' भगवान् बुद्धासाठीं ' व ' उपनिषत्सार '

[श्री. शंकरराव देव यांचीं हीं पुस्तकें प्रकाशित होऊन बरेच दिवस झाले. पण आचार्य विनोबा यांच्या अवलोकनांत हीं पुस्तकें नुकतींच आलीं. आचार्य विनोबा यांचा या पुस्तकांवरील अभिप्राय श्री. प्रेमा कंटक यांना त्यांनीं गेल्या ऑगस्टमध्यें पाठविलेल्या पत्रांतून आला आहे. तो

' भगवान् बुद्धासाठीं '—श्री. शंकरराव देव, सु. रा. ग्रंथमाला, पुणें, पानें २१४. मूल्य ३॥ रु.
' उपनिषत्सार '—श्री. शंकरराव देव, सु. रा. ग्रंथमाला, पुणें, पानें १५०. मूल्य ३ रु.










श्री. प्रेमा कंटक यांच्या कृपेनें पुढें उद्धृत केला आहे :]

"शंकररावांचीं दोन्हीं पुस्तकें मीं चाळून पाहिलीं आहेत. 'भगवान् बुद्धासाठीं' हें पुस्तक मूळ लेखकानें ज्या भावनेनें लिहिलें त्याच भावनेनें मराठींत उतरलें आहे. मराठी वाचकांना गोड वाटेल असेंच त्याचें स्वरूप आहे.

"उपनिषत्सार' या पुस्तकानें मात्र माझा एक सबंध तास घेतला. पुस्तकाची प्रस्तावना हृदयंगम वाटली. उपनिषदें एवढीं व्यापक आहेत कीं, तत्संबंधीं अनेकांची अनेक प्रकारची दृष्टि स्वाभाविकच असूं शकते. आणि मुख्यतः राधाकृष्णन् आणि रानडे यांच्या ग्रंथांची छायारूप ही कृति असल्यामुळें त्यांतील दृष्टि मला पूर्वावगतच होती. मी या दृष्टीशीं पूर्णपणें एकरूप होऊं शकलों नाहीं, याबद्दल मी कुणासच दोष देऊं शकत नाहीं.

"सद्विचारांनीं भरलेल्या पुस्तकांत अयदंश मिसळला गेला म्हणजे तो अधिकच घातक होतो. उदाहरणार्थ, रैक्व ऋषीच्या आख्यायिकेचा उल्लेख करून तींतून 'रैक्व ऋषि ब्रह्मविद् असला तरी तो स्त्रीसौख्याविषयीं उदासीन नव्हता' असें अनुमान काढलें आहे. रैक्व ऋषि कसा होता अथवा नव्हता याबद्दल आम्हांस कांहीं कर्तव्य नाहीं. जसें त्याचें नशीब असेल तसा तो होता. पण सदर वाक्यांत ब्रह्मवेत्त्याविषयीं जी कल्पना सुचविली आहे ती मी मान्य करूं शकत नाहीं. ब्रह्मानुभवी पुरुष ज्या भूमिकेवर असतो तींत कर्म तरी कितपत शक्य होतें येथून प्रश्न उत्पन्न होतो. उत्तरांत लोकोपकारासाठीं प्रारब्धवशात् निष्काम कर्म तो करूं शकतो असा निष्कर्ष काढला जातो. पण त्या निष्काम कर्मयोगांत काय काय मावतें याविषयीं अलीकडे अनेक लोक अनेक कल्पना मांडतात. तो हिंसात्मक लढाया करूं शकतो, असें कुणाचें मत आहे. गृहस्थाश्रमाचा नवीन पसारा चालूं शकतो, असेंहि कुणी मानतात. असे हे सर्व कल्पनेचे खेळ चालू आहेत.

"पुस्तकाची भाषा सरळ, सोपी आहे. वाचकाला वाचतांना कुठेंच अडखळल्यासारखें होत नाहीं."

—आचार्य विनोबा

---

# 'उपनिषदें व मी'

श्री. शंकरराव देव

[श्री. शंकरराव देव यांच्या 'उपनिषत्सार' या पुस्तकावर आचार्य विनोबा यांनीं दिलेला अभिप्राय वर छापला आहे. त्या अभिप्रायांत विनोबा यांनीं 'उपनिषत्सारा'च्या ज्या प्रस्तावनेचा 'हृदयंगम' असा उल्लेख केला आहे, ती प्रस्तावना येथें उद्धृत केली आहे. ह्या प्रस्तावनेंत श्री. शंकरराव देव यांनीं आपल्या जीवनांतील आंतरिक प्रेरणांचें जें ओझरतें दर्शन घडविलें आहे, तें वाचकांस अनेक दृष्टींनीं उद्बोधक वाटेल. —का. सं.]

मला जीवनाची जाणीव झाली त्या वेळीं मी मातृहीन झालेलों होतों. जीवनाला जिव्हाळ्यानें मार्गदर्शन करील असें कोणी नव्हतें. म्हणून या विषयाची गोडी मला कशी लागली हें सांगतां येत नाहीं. कोणीं ती लावण्याचा खास प्रयत्न केला असेंहि नाहीं. मला जें स्मरतें तें असें कीं, लहानपणीं इंग्रजी शाळेंत विद्यार्थिदशेंत असतांनाच महाभारत, भागवत यांसारखे धार्मिक ग्रंथ वाचण्याची आवड मला लागली. त्या वेळीं डॉ. ॲनी बेझंट यांच्या प्रेरणेनें भारतीय तत्त्वज्ञान आणि संस्कृति यांच्या पुनरुज्जीवनाचे प्रयत्नहि या देशांत सुरू होते. या विषयाचें वाचन आम्हीं विद्यार्थ्यांनीं करावें व त्यांत आम्हांला गोडी लागावी म्हणून या विषयावरचीं सुबोध पुस्तकें लावून त्या बाबतींत परीक्षा घेतल्या जात असत. या परीक्षांना बसण्याची आवड मला लागली होती. मी थोडा मोठा झालों तेव्हां त्याच सुमारास श्रीरामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद आणि स्वामी रामतीर्थ

यांचीं चरित्रें व व्याख्यानें मराठींत प्रसिद्ध होऊं लागलीं होतीं. तीं वाचण्याचा मला छंद लागलेला होता.

माझ्या बावधन गांवीं श्री. वामनतात्या करंदीकर या नांवाचे शेतकरी-जीवन घालविणारे एक शुचिर्भूत ब्राह्मण गृहस्थ होते. सकाळीं कृष्णास्नान, दुपारीं देवपूजा व सायंकाळीं पुराण-प्रवचन अशी त्यांची सात्त्विक दिनचर्या असे. या गृहस्थांपाशीं मीं प्रथम गीतेची संथा घेतली. अर्थात्, त्यांत केवळ पाठांतर होतें, अर्थबोध नव्हता.

या सर्व गोष्टींनीं असा एक परिणाम झाला कीं, वेदान्त-तत्त्वज्ञानानें व त्यांतील आदर्श जीवनानें माझ्या मनाची पकड घेतली. त्यांमध्यें जीवनाचा जो आदर्श दाखविला आहे, तो आपण आपल्या जीवनांत उतरवावा, असें माझ्या मनानें त्या वेळे-पासून घेतलें होतें. अर्थात्, त्या बालवयांत या गोष्टींचा मीं खोल विचार केला होता असें नाहीं. तीं एक कल्पनागत अद्‌भुतरम्यता होती हें कबूल केलें पाहिजे. ऋषी, त्यांचे ते आश्रम, ते आश्रम-वासी, त्या आश्रमांत बागडणारीं हरिणें, गायी आणि तेथें वाढविलेले लतावृक्ष, तेथील उदात्त जीवनांत नांदणारें प्रेमाचें व शांतीचें वातावरण हें माझ्या कल्पनेपुढें सारखें नाचत असे. आपणहि असा एक आश्रम काढावा आणि आश्रमीय आदर्श आपल्या जीवनांत आणावा, आपल्या आसमंतात् तें वातावरण पसरवावें, असें त्या वयापासूनच मला वाटे.

जेव्हां मी कॉलेजांत गेलों तेव्हां लोकमान्यांचा ‘ गीतारहस्य ’, अरविंदांचा ‘ Essays on the Gita ’ यांसारखे ग्रंथ माझ्या वाचनांत आले. लोकमान्यांचा ‘ गीतारहस्य ’ ग्रंथ प्रथम प्रसिद्ध झाला तेव्हां त्याची किंमत तीन रुपये होती. मी एक गरीब विद्यार्थी होतों. त्यामुळें तेवढे पैसे देऊन तो ग्रंथ खरेदी करण्याचीहि माझी ऐपत नव्हती. ज्यांच्या आश्रयाला मी राहिलों होतों त्यांच्याकडून तीन रुपये घेऊन तो ग्रंथ मीं ज्या आतुरतेनें बुधवार चौकांतील एका दुकानांतून विकत घेतला, त्या आतुरतेचा आणि तो हातीं घेतांच माझ्या मनाला जो पराकाष्ठेचा आनंद झाला त्या आनंदाचा ठसा आजहि माझ्या अंतःकरणावर तितकाच ताजा आहे.

योगायोग असा कीं, कॉलेज-शिक्षण घेऊन मीं बाहेर पडलों त्या वेळीं गांधीजींनीं भारताच्या जीवनांत नुकतेंच पदार्पण केलें होतें. देशसेवेसाठीं जीवन अर्पण करावयाचें अशी शपथ शाळेंत असतांनाच मीं देवाला साक्षी ठेवून घेतली होती. त्या वेळीं माझ्यासोबत आणखी असे दोन मित्र होते. १९१९ सालीं श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्यामुळें माझा गांधीजींशीं संबंध आला. त्या वेळीं गांधीजींचा अहमदाबादेस आश्रम होता, असें मला समजलें. त्यावरून ऋषींच्या आश्रमाचें तें कल्पनेंत अनुभवलेलें आणि वागविलेलें चित्र आजहि प्रत्यक्षांत येऊं शकतें, असें आश्वासन माझ्या मनाला मिळालें.

तथापि, मी गांधीजींच्या आश्रमांत दाखल झालों नाहीं, किंवा स्वतंत्र रीतीनें आश्रमीय जीवनाचा प्रारंभहि केला नाहीं. याचा अर्थ असाच घेतला पाहिजे कीं, आश्रमजीवनाविषयीं माझ्या मनाला वाटणारें आकर्षण केवळ कल्पनागत किंवा बुद्धिगतच होतें; ती माझी स्वभावप्रवृत्ति नव्हती. माझी स्वभावप्रवृत्ति ही अद्यापि राजकारणीच होती असें दिसतें. आणि देशांतील, विशेषतः महाराष्ट्रांतील, त्या वेळच्या परिस्थितीनें राजकारण हीच माझी प्रवृत्ति व प्रधान कार्य बनविलें. भाग्य आमचें किंवा माझें कीं, स्वराज्याकडे नेणारा गांधीजींचा रस्ता जेलमधून जात होता. जेल म्हणजे नरक, समाजद्रोहा-बद्दल शासन भोगण्याचें यातनाघर, अशी सर्व-सामान्य समजूत. पण गांधीजींनीं जेलचें ‘ मंदिर ’ बनविलें. मला तेथें आश्रमीय जीवन मिळालें. नियमितपणा, साधी राहणी व संयमी जीवन यांचें शिक्षण मिळण्याची ती जणूं शाळाच होती. जेव्हां जेव्हां मला जेलमध्यें जाण्याचा प्रसंग आला, तेव्हां तेव्हां धर्मग्रंथवाचन, तत्त्वचिंतन आणि तत्त्वाभ्यास हें माझें सहजकर्म बनलें आहे. ‘ मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ’ असें म्हटलें आहे तें खरें आहे.

असें असल्यामुळें मधून मधून मला जेल-मधल्या या आश्रमीय जीवनाची एक प्रकारें भूक लागे. हें योग्य कीं अयोग्य, याचा माझ्या मनाला अजून निर्णय करतां आलेला नाहीं. जेलमध्यें जाण्यापूर्वीं उपनिषदें माझ्या वाचण्यांत आलीं










होतीं कीं नाहीं, याचें मला आज स्मरण नाहीं. पण मला स्मरतें तें हें कीं, जेव्हां मीं प्रथम उपनिषदें वाचलीं आणि त्यांतील 'नायमात्मा प्रवचनेन लभ्यः' किंवा 'सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम्। अन्तःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः।' या प्रकारचीं मंत्रवाक्यें उच्चारलीं, तेव्हां माझ्या आध्यात्मिक जीवनाचा आदर्शच जणूं माझ्यापुढें साक्षात् होत आहे असा मला भास झाला आणि त्या मंत्रवाक्यांच्या नुसत्या घोषांतूनहि माझा आनंद आणि माझी चित्तवृत्ति उत्तरोत्तर उन्नत होत जात आहे, असें मीं अनुभविलें.

आजहि ज्या ज्या वेळीं मी उपनिषदांतील मंत्र माझ्या ओबड-धोबड कंठांतून गातों, त्या त्या वेळीं अत्यंत सुरेल अशा संगीताहूनहि ते मला अधिक श्रुतिमनोहर प्रतीत होतात. आणि त्या नादब्रह्मांतून मला जो आनंद मिळतो तो शब्दांनीं वर्णन करणें शक्य नाहीं. आजहि मला दुसरें कांहीं वाचावयास मिळालें नाहीं आणि केवळ उपनिषदेंच माझ्यापाशीं राहिलीं, तरीसुद्धां जीवनांतील उच्च आनंद आणि रस मला अखंड मिळत राहतील, असें मला वाटतें. हें असें कसें होतें याचा खुलासा माझ्या मतें 'पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः' या गीतावचनांत सांगितला एवढाच आहे.

मुळशी सत्याग्रहांत मला दोन वेळां कारागृहवास घडला. पण तो अल्प मुदतीचा होता. एकदां एक महिना साधी कैद व दुसऱ्यांदा तीन महिने सक्तमजुरी. याच सुमारास गांधीजींचें असहकारितेचें आंदोलन देशांत झंझावाताप्रमाणें सुरू होतें. त्याचा परिणाम म्हणून देशांतील अनेक लोकांना दीर्घ मुदतीच्या शिक्षा दिल्या गेल्या होत्या. आपल्याला हें भाग्य लाभलें नाहीं याबद्दल महाराष्ट्रांतील माझ्यासारख्या अनेक तरुण कार्यकर्त्यांना मनांतून एक प्रकारचें वैषम्य वाटत होतें. महाराष्ट्र या असहकारितेच्या यज्ञापासून वंचित राहण्याचें कारण त्या वेळची महाराष्ट्रांतील विशिष्ट परिस्थिति होती. मुळशी-सत्याग्रहामुळें महाराष्ट्राचा आत्मगौरव थोडा-फार राखला गेला.

१९२७ सालीं 'स्वराज्य' पत्रांत लिहिलेल्या एका संपादकीय लेखाबद्दल मला व माझे सहकारी श्री. व्यंकटेश हरोलीकर यांना दोन वर्षांची शिक्षा झाली. हीच माझी पहिली दीर्घ मुदतीची शिक्षा होती. त्या वेळीं माझे सहकारी श्री. हरोलीकर यांच्या मदतीनें मीं संस्कृतांत थोडा प्रवेश करून घेतला. माझ्याबरोबर मीं गीता, उपनिषदें हे ग्रंथ जसे घेतले होते, तसा कांहीं मित्रांच्या सांगण्यावरून ज्ञानेश्वरी हाहि ग्रंथ घेतला होता. या ग्रंथाचा माझ्या जीवनावर विलक्षण परिणाम झाला. आणि ज्ञानेश्वरीमध्यें विषयविस्मृति, विकारशांति, स्थिरवृत्ति यांची गुरुकिल्ली आहे असें मला आढळून आलें. ज्ञानेश्वर हे या ग्रंथाच्या रूपानें माझे गुरु झाले आणि पंढरीचा पांडुरंग माझें आराध्य-दैवत बनला. ज्ञानेश्वरींतील कांहीं निवडक भाग मीं मुखोद्गत केला. या ग्रंथाच्या वाचनानें व अभ्यासानें एका नवीन जीवनाची दीक्षा घेण्याची स्फूर्ति मला मिळाली. जेलमधून सुटल्यानंतर कोरड्या भिक्षेवर उदरनिर्वाह करून सेवाकार्य करावयाचें असा त्याच वेळीं मीं संकल्प केला.

जेलच्या या मुदतींत गीता आणि तत्त्वज्ञान या विषयांवरील ग्रंथ वाचणें हा माझा स्वाध्याय होता. श्री. जे. कृष्णमूर्ति यांचें 'At the Feet of the Master' हें पुस्तक मीं वाचलें. त्या वेळच्या माझ्या अल्पबुद्धीप्रमाणें मीं गीतेवर एक ग्रंथ लिहिण्याचें धाडसहि केलें होतें. परंतु अनिकेत असा मी, त्या हस्तलिखिताला सांभाळूं शकलों नाहीं. बरें झालें, तें हरवलें!

पावणेदोन वर्षांच्या कालावधीनंतर जेव्हां आम्ही दोघे जेलच्या बाहेर आलों, तेव्हां माझा सारा परिग्रह श्री. हरोलीकर यांच्याकडे देऊन मीं तशीच तडक पायीं आळंदी गाठली आणि प्रथम ज्ञानेश्वरांच्या समाधीचें दर्शन घेतलें. जेलमध्यें संकल्प केलेल्या विशिष्ट सांप्रदायिक जीवनाची प्रत्यक्ष दीक्षा मीं श्री. नारायणशास्त्री मराठे (वाई) यांच्या आशीर्वादानें घेतली व कोरडी भिक्षा मागावयाला आरंभहि केला. परंतु अध्यात्मांतून निर्माण होणारी निःसंकोच व निरहंकार वृत्ति माझ्यामध्यें नाहीं, असा मला अनुभव आला व








माझे पाय मार्गे ओढले. या स्खलनाचें प्रायश्चित्त म्हणून दोन-अडीच वर्षे मीं अन्न वर्ज्य केलें होतें व फलाहारावर राहिलों होतों. कांहीं काळ जेव्हां जेव्हां माझें पंढरपुरास जाणें होई तेव्हां तेव्हां पांडुरंगाचें दर्शन, मंदिराच्या मंडपांत अल्पकाल बैठक व त्या दिवशीं उपवास, हा ज्ञानेश्वरांकडून मिळालेल्या दीक्षेचा अवशेष थोडे दिवस राहिला होता. स्वीकारलेलें सांप्रदायिक जीवन जरी मी पुढें चालवूं शकलों नाहीं, तरी ज्ञानेश्वरांनीं दिलेल्या दीक्षेचा माझ्या वृत्तीवर जो परिणाम झाला त्यानें वैषयिक जीवनापासून माझा बचाव केला आणि तो कायमचा. तेलाचा बिंदु जसा पाण्यावर पसरावा, तसा तो परिणाम माझ्या जीवनावर पसरण्याची क्रिया जी एकदां सुरू झाली ती आजहि तशीच सुरू आहे.

१९३० सालीं गांधीजींनीं स्वातंत्र्याचा लढा पुन्हां सुरू केला. या लढ्यांत प्रथम ठाणें व नंतर येरवडा आणि नाशिक या तुरुंगांत मला पुन्हां स्वाध्याय करण्याला सवड मिळाली. येथें श्री. राधाकृष्णन् यांचा 'The Philosophy of the Upanishads' हा ग्रंथ माझ्या वाचण्यांत आला. त्याच्या प्रस्तावनेंतील पुढील वाक्यानें तो ग्रंथ मराठींत यावा असें मला वाटलें : "It was the gospel of spiritual evolution which Buddha, true to the spirit of the Upanishads, preached 2500 years ago, and it is for a representation of the same gospel, in the spirit of the same philosophy, that the world is waiting now." ("पंचवीसशें वर्षांपूर्वी भगवान् बुद्धानें उपनिषदांच्या अंतरंगाचें यथार्थत्वानें दर्शन घडविणारा जो संदेश दिला, तो अध्यात्म-विकासाचा होता; आणि आजहि जग जशाच्या तशा त्या संदेशाच्या अनुशासनाची मार्गप्रतीक्षा करीत आहे")

'उपनिषदांतील दहा गोष्टी' मीं येथें असतांनाच लिहिल्या. ज्यांना संस्कृत व इंग्रजी अवगत नाहीं त्यांच्यासाठीं सुलभ मराठींत, उपनिषदांचें सार श्री. राधाकृष्णन् यांनीं आपल्या ग्रंथांत अवलंबिलेली पद्धति स्वीकारून आणलें पाहिजे, असें मला वाटलें. परंतु तो काळ असा होता कीं, जेलमध्यें केलेले संकल्प माझ्यासारख्याला जेलमध्येंच पुरे करणें शक्य होतें. १९४० च्या वैयक्तिक सत्याग्रहांत मला दीड वर्षांची सजा मिळाली व येरवडा जेलमध्यें मला ठेवण्यांत आलें. १९३२–३४ सालीं नाशिकच्या जेलमध्यें केलेला संकल्प येथें पुरा करण्याचें मीं ठरविलें. शिवाय दुसरी अशीहि पुष्कळ दिवसांपासून इच्छा होती कीं, श्रीशंकराचार्यांच्या उपनिषद्भाष्यावरून उपनिषदांचें वाचन करावें. तीहि इच्छा या वेळीं पुरी होण्याचा सुंदर सुयोग आला. या वेळीं टिळक विद्यापीठाचे आचार्य लिमये हे मला येथें सहनिवासी मिळाले. मला संस्कृत भाषेचें ज्ञान मुळींच नव्हतें. कारण बी. ए. पर्यंत फ्रेंच ही माझी दुसरी भाषा होती. आचार्य लिमये यांना मी शांकरभाष्यावरून उपनिषदें समजावून देण्याची विनंति केली आणि त्यांनीं ती मोठ्या उत्साहानें व आनंदानें मान्य केली. तावडतोब माझ्या कोठडींत एक अभ्यास-मंडळ सुरू झालें. श्री. लिमये हे आचार्य आणि आम्ही पांच-दहा मंडळी त्यांचे छात्र, असा आनंद आम्ही रोज लुटूं लागलों. या विषयावरील आचार्यांच्या गाढ व्यासंगाची साक्ष मला पटून त्यांच्याविषयींचा माझा आदर दुणावला.

या अभ्यासानें उपनिषदांतील गूढार्थ समजण्याला मला मदत झाली. उपनिषदांत प्रतिपादिलेले अध्यात्माचे सिद्धान्त व्यवहारांत अनुभवण्यास मनाची अवस्था आणि इंद्रियांचे व्यापार हे कसे असावेत यासंबंधीं फोड करतांना बुद्धीचीं कवाडें खुलीं करणारीं अनेक वचनें श्रीशंकराचार्यांच्या भाष्यांत मधून मधून विखुरलेलीं आढळतात. त्या वचनांची उपनिषदांचें सार समजण्याला तर मला मदत झालीच, पण शंकराचार्यांच्या साक्षात्कारित्वाचीहि साक्ष माझ्या मनाला पटली.

'उपनिषत्सार' लिहिण्याला मीं येथें सुरुवात केली. श्री. राधाकृष्णन् यांचा 'The Philosophy of the Upanishads' हा ग्रंथ मीं त्यासाठीं आधाराला घेतला होता. त्यांची मांडणी मीं संपूर्णपणें स्वीकारली आहे. त्याचप्रमाणें त्यांचे विचारहि बहुतांशीं घेऊन अनेक उतारे










जसेच्या तसेच अनुवादिले आहेत. त्याचबरोबर प्रा. रानडे यांच्या ' A Constructive Survey of Upanishadic Philosophy ' या ग्रंथाचाहि मीं उदारहस्तें उपयोग केला आहे. अशा रीतीनें ' उपनिषत्सार ' हें पुस्तक उपनिषदांवरील अनेक ग्रंथांतील उताऱ्यांचा अनुवाद करून बनविलेलें आहे, असें म्हटलें तरी चालेल.

येरवड्यांत हें लिखाण मी पुरें करूं शकलों नाहीं. १९४२ च्या ' क्विट इंडिया '-(' भारत सोडा ) च्या लढ्यांत अहमदनगरच्या किल्ल्यांतील २॥। वर्षांच्या वास्तव्यांत तें शेवटीं पुरें झालें.

' उपनिषत्सारा 'सारखा प्रबंध लिहिण्याचा माझा अधिकार नाहीं याची मला पूर्ण जाणीव आहे... म्हणून मीं असें ठरविलें होतें कीं, ह्याला कोणा अधिकारी व्यक्तीची मान्यता मिळाल्यावांचून तें पुस्तक-रूपानें प्रसिद्ध करावयाचें नाहीं. माझे सहकारी व स्नेही आचार्य भागवत यांना या कामासाठीं मीं योजून ठेवलें होतें. त्यांनीं मान्यता दिली तरच हा ग्रंथ प्रसिद्ध करावयाचा, नाहीं तर नाहीं, असें मीं निश्चित ठरविलें होतें... त्यांनीं पुस्तकपरीक्षणाचें व शुद्धीचें काम पूर्ण केलें. ही त्यांची माझ्यावर खरोखर कृपा होय. त्यांच्यामुळें या ग्रंथाचें स्वरूप नवीनच बनलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

श्री. राधाकृष्णन् यांच्या ज्या वाक्यानें मला हें पुस्तक मराठींत आणण्याची स्फूर्ति दिली, त्या वाक्यामागील हेतु सिद्ध होण्यास माझा प्रयत्न जरी अल्पांशानें निमित्त मात्र झाला, तरी त्याचें सार्थक झालें असें मी मानीन.

---

प त्र व्य व हा र

# ॲरिस्टॉटलचें पारडें पुष्कळच जड

' ॲरिस्टॉटलविरुद्ध मोहीम ' या शीर्षकाचा प्रा० साहुलकर यांचा ' नवभारता 'च्या डिसेंबर १९५२ च्या अंकांतील लेख वाचला. आपल्याइकडील आजच्या अध्यापनांत जी उणीव आहे ती त्यांत दाखविली आहे. परंतु त्यांतलें प्रतिपादन एकांगी आहे, व त्यांत सुचविलेले सिद्धान्त प्रमाणभूत मानतां येत नाहींत. रसेलच्या ' हिस्टरी ऑफ फिलॉसफी 'इतका तत्त्वज्ञानेतिहासावरील उथळ ग्रंथ सांपडणें कठीण आहे. ' Introduction to Mathematical Philosophy ', ' Problems of Philosophy ' इत्यादि ग्रंथ लिहिणाऱ्या ग्रंथकारानें असा ग्रंथ लिहावा याचें तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकांस सखेदाश्चर्य वाटत आलें आहे. स्पिनोझाचें तत्त्वज्ञान नीतिमूल्यविषयक आहे त्यांत सद्वस्तूच्या स्वभावाबद्दलची महत्त्वाची अशी उपपत्ति नाहीं, हें रसेलचें विधान हास्यास्पद आहे व केवळ स्पिनोझाच्या मुख्य तात्त्विक ग्रंथाला ' ईथिक्स ' असें नांव आहे यापेक्षां या विधानास कांहीं आधार नाहीं. ॲरिस्टॉटलचें 'लॉजिक' सर्वंकष नाहीं, त्याला इंडक्टिव्ह लॉजिकची जोड पाहिजे, विज्ञान, गणित व तत्त्वज्ञान यांचा निकट संबंध आहे, वगैरे विधानें खरीं आहेत व अलीकडील विचारवंतांनीं त्यांचें महत्त्व जाणलें आहे. परंतु वादाच्या भरांत केलेलीं त्यांचीं सर्वच विधानें-ॲरिस्टॉटलचें तर्कशास्त्र अगदीं कुचकामाचें होय, अशांसारखीं--अक्षरशः खरीं मानण्यांत फार धोका आहे. *a priori* या शब्दाच्या अर्थाबद्दल पुष्कळांचा गैरसमज झाला आहे. ॲरिस्टॉटलच्या किंवा त्याचा मागोवा घेणाऱ्यांच्या प्रतिपादनांतील a priorie म्हणजे ' अनुभवातीत ' असें चुकीचें मानलें जातें. बूल, फ्रेगे, रसेल, व्हाइटहेड, जॉनसन् या सर्वांनीं तर्कशास्त्रांत टाकलेली भर ( contribution ) व ॲरिस्टॉटलनें पूर्वी घातलेली भर यांची निःपक्षपाती बुद्धीनें तुलना केली तर ॲरिस्टॉटलचें पारडें पुष्कळच जड आहे, असें दिसून येईल. 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वं ' म्हणतात त्याप्रमाणेंच प्लेटो व ॲरिस्टॉटल यांनीं कित्येक शतकांपूर्वी मानवी अनुभवविषयक जे कांहीं सिद्धांत बांधले आहेत ते अद्यापहि अबाधित आहेत. जवळच्या कांहीं दृश्यांनीं, एकंदर देखाव्याची रूपरेखा व वैशिष्ट्यें विसरून जाण्याची चूक करावयाची नसली, तर ॲरिस्टॉटल व त्याचे भक्त यांच्या कचाट्यांतून सुटून ' सुखी संसार ' करण्याचे मनोरथ कोणीं योजूं नयेत !

पुणें.

—प्र. रा. दामले

# सारसंकलन

## बडोद्याची मराठी वाङ्मय-परिषद्

बडोद्याच्या मराठी वाङ्मय-परिषदेचें यंदाचें १६ वें अधिवेशन म. म. दत्तो वामन पोतदार यांच्या अध्यक्षतेखालीं नोव्हेंबरच्या अखेरीस भरलें होतें. अध्यक्षांचें विचारपूर्ण भाषण या अंकीं अन्यत्र दिलेलेंच आहे. त्याशिवाय यंदाच्या अधिवेशनाचा विशेष म्हणजे प्रा. गं. बा. सरदार यांचीं 'मराठी वाङ्मयांतील मानवतावाद' या विषयावरचीं तीन व्याख्यानें. व्याख्यात्यांनीं, ब्रिटिशपूर्व काळ, पहिल्या महायुद्धापर्यंतचा ब्रिटिश काळ आणि तिसरा १९२० नंतरचा काळ—अशा तीन कालखंडांतील मानवता-विषयक साहित्यिक विचारांचा मागोवा घेत सुबोध आणि विचारप्रवर्तक व्याख्यानें दिलीं. तींहि लवकरच 'नवभारता'तून येतील असें समजतें. सर्वच ठिकाणीं घडतें त्याप्रमाणें येथेंहि संमेलनाचा मुख्य भर समारंभावर व मनोरंजनावर होता. आचार्य प्र. के. अत्रे यांच्या 'उद्यांचा संसार' या नाटकाचा संमिश्र प्रयोग येथील हौशी कलावंत स्त्री-पुरुषांनीं चांगल्या प्रकारें करून दाखविला. सौ. सीता कागल या रेडिओ-गायिकेच्या गाण्याचा कार्यक्रमहि चांगला होता.

दरवर्षाप्रमाणें यंदाहि तीन चर्चा ठेवल्या होत्या. चर्चांचे विषय आणि चर्चेंतील वक्त्यांची निवड या-संबंधांत अधिक योजनापूर्वक प्रयत्न व्हावयास पाहिजेत असें मत एकंदरीनें तिन्ही चर्चांचा विचार केल्यावर बनतें. 'प्रादेशिक विद्यापीठें' या विषयावर चर्चा झाली. त्यांत तीनच वक्ते बोलले. प्रादेशिक विद्यापीठांचें विशिष्ट कार्य व माध्यम-भाषेचा प्रश्न यांचा ऊहापोह बऱ्यापैकीं झाला. परंतु अध्यक्षांनीं समारोपांत म्हटल्याप्रमाणें सर्वत्र मराठीसंबंधींची पोटतिडीकच मुळांत कमी आढळत असल्यामुळें, अनेक अडचणी अनिवार्य ठरतात, हेंच खरें. दुसरी चर्चा 'शालेय साहित्य व बालशिक्षण' या विषयासंबंधीं झाली. ही चर्चा एकंदरींत चांगली झाली असें मत अध्यक्षांनीं व्यक्त केलें व तसेंच बहुतेक श्रोत्यांसहि वाटलें. 'साहित्यां-तील नवीनतेला वास्तवतेचा पाया पाहिजे काय ?' या लांबलचक विषयाची चर्चा फारशी उच्च पातळीवरून झाली नाहीं. आधुनिक काळांतील निरनिराळ्या तात्त्विक व राजकीय विचारसरणींच्या अनुरोधानें ही चर्चा व्हावयास पाहिजे होती; निदान योजकांचा तरी तसा इरादा असावा. पण प्रत्यक्ष चर्चेंत अगदींच सामान्य तऱ्हेचा युक्तिवाद मांडला गेला. यापेक्षां अधिक तयारीनें व गंभीरपणें चर्चा व्हावयास पाहिजे असें त्या वेळीं हजर असलेल्यांना निश्चित वाटलें.

एकंदरीनें पाहतां, यंदाचें अधिवेशन मुख्यतः प्रा. सरदारांच्या व्याख्यानांमुळें लक्षांत राहण्या-सारखें झालें. या नवीन प्रथेबद्दल वाङ्मय-परिषदेच्या यंदाच्या संचालकांचें अभिनंदन.

—डॉ. ना. ग. जोशी

## 'आंतरभारती'च्या कार्यास प्रारंभ

सुप्रसिद्ध अग्रगण्य कन्नड साहित्यिक श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार यांचा जाहीर सत्कार ३०।११।५२ ला डॉ. जयकर यांच्या अध्यक्षते-खालीं पुणें येथें होऊन, 'आंतरभारती'च्या कार्यास प्रारंभ झाला. साने गुरुजींचें आंतर-भारतीचें स्वप्न अशा रीतीनें साकार होत आहे हें अत्यंत अभिनंदनीय होय. 'आंतरभारती'चे संचालक आचार्य स. ज. भागवत यांनीं 'आंतरभारती'च्या संकल्पित कामाची जी माहिती या वेळीं व पूर्वी ('साधना', दिवाळी अंक सन १९५२) दिली आहे, ती पाहतां 'आंतर-भारती'च्या प्रत्यक्ष कार्याचे तीन भाग योजिलेले आहेत : (१) भारतीय भाषांचा व कलांचा अभ्यास करण्यासाठीं अनुकूल ठिकाणीं 'आंतर-भारती' केंद्रांची उभारणी करणें हा पहिला भाग होय. (२) 'आंतरभारती'चा दुसरा कार्यक्रम म्हणजे 'आंतरभारती-प्रकाशनमाला' सुरू करणें. त्याप्रमाणें त्या मालेचें पहिलें पुष्प म्हणून धारवाड येथील प्रख्यात संशोधक श्री. शं. बा. जोशी यांचें 'मऱ्हाटी संस्कृति : कांहीं समस्या' हें संशोधनात्मक पुस्तक नुकतेंच २४ डिसेंबरला (साने गुरुजींच्या जन्म-स्मृतिदिनीं) प्रसिद्ध झालें आहे. (३) आंतर-भारतीच्या कार्याचा तिसरा भाग म्हणजे परभाषीय साहित्यिकांचा आणि कलावंतांचा आपल्या प्रांतांतील साहित्यिकांशीं आणि कला-



अनुक्रमणिका






वंतांशीं परिचय घडवून आणणें.—श्री. मास्ती वेंकटेश यांचा जाहीर सत्कार व पुणें येथील त्यांचे विविध कार्यक्रम हे 'आंतर-भारती'च्या या तिसऱ्या उद्दिष्टाप्रमाणें होत.

कन्नड भाषेमधील एक साहित्य-सेवक व सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजांतील प्राध्यापक श्री. रं. श्री. मुगळी यांनीं श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार यांचा अल्प परिचय ( ' साधना ' २९-११-५२ ) करून दिला आहे. श्री. मास्ती हे नवकर्नाटकाचें स्फूर्तिकेंद्र असलेल्या प्रथमश्रेणीच्या व्यक्तींपैकीं एक असून, काव्य, कादंबरी, नाटक, साहित्यसमीक्षणात्मक प्रबंध इत्यादि प्रकारांद्वारें त्यांनीं थोर साहित्य-सेवा केली आहे. आधुनिक कन्नड वाङ्मयामध्यें लघुकथांचे जनक म्हणून त्यांची ख्याति असून, त्यांच्या लघुकथा इंग्रजींतूनहि अनुवादित झालेल्या आहेत. निसर्ग आणि सामान्य मानव यांच्याबद्दल प्रेम, आध्यात्मिक भावना, सरळ शैली, निर्मल सात्त्विकता, भारताच्या प्राचीन परंपरेंतील उत्तम अंशासंबंधीं नितान्त निष्ठा, परकीयांच्या उत्तम अंशाविषयीं स्वीकारबुद्धि इत्यादि गुणसमुच्चय हें त्यांचें वैशिष्ट्य आहे. साने गुरुजींच्या आंतर-भारतीच्या कार्यास जाहीरपणें प्रारंभ करावयास त्यांच्यासारखाच ' समानधर्मा ' असा एक अत्यंत थोर साहित्यिक लाभला, ही अभिनंदनीय गोष्ट होय.

गेल्या ३० नोव्हेंबर १९५२ ला पुण्यांत त्यांच्या सत्कारप्रसंगीं श्री. मास्ती यांनीं जें भाषण केलें त्यापैकीं पुढील भाग ' साधने '–( ६-१२-५२ ) वरून उद्धृत केला आहे :

" श्री. साने गुरुजींची 'आंतरभारती'ची कल्पना फार महान् व भव्य आहे. परंतु आपल्याला ती कांहीं नवीन नाहीं. सर्वांतील चांगलें घेऊन तें आत्मसात् करण्याच्या आपल्या परंपरेपैकींच ती आहे. मला माझ्या आजोबांचा काळ आठवतो. ते कधींहि आपलें गांव सोडून कोठें बाहेर गेले नाहींत. आपल्या अंगणांतील विहिरींतील गढूळ पाण्यानेंच ते स्नान करीत. परंतु तें पाणी अंगावर घेतांना ते ' गंगे च यमुने चैव गोदावरि सरस्वति । नर्मदे सिंधु कावेरि जलेऽस्मिन् सन्निधिं कुरु ॥ ' हा मंत्र म्हणत. याचा अर्थ गंगा, यमुना, गोदावरी यांनीं वेष्टिलेला आमचा हा विशाल देश एक आहे अशी श्रद्धा त्या वेळीं होती. एक देश व एक धर्म हीं आमची वैशिष्ट्यें होतीं. त्या वेळीं आपल्या येथें राजकीय किंवा शासनात्मक ऐक्य नव्हतें. परंतु आध्यात्मिक दृष्ट्या आपण एक आहोंत ही भावना अत्यंत प्रबळ होती. दीड शतकाच्या गुलामीनंतर आतां आपण राजकीय दृष्ट्या एक झालों आहोंत. परंतु आध्यात्मिक दृष्ट्या एक असल्याची प्रचीति आपल्याला येईनाशी झाली आहे. ही आध्यात्मिक व सांस्कृतिक ऐक्याची जाणीव निर्माण करणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे. राजकीय दृष्ट्या विभागलेलें राहून आध्यात्मिक दृष्ट्या एक असणें एक वेळ परवडलें; परंतु राजकीय दृष्ट्या एक झाल्यानंतरहि मानसिक व आध्यात्मिक दृष्ट्या भंगलेलें राहणें हें अत्यंत धोक्याचें आहे. हा धोका टाळण्याच्या कामीं ' आंतरभारती 'चें खूप साहाय्य होईल असें मला वाटतें.

" वस्तुतः इंग्रजांच्या अज्ञानामुळें व कांहीं अंशीं त्यांच्या भेदनीतीमुळें, हिंदुस्थान हें एक राष्ट्र नसून अनेक राष्ट्रांचें एक खंड आहे असें मानण्याची प्रवृत्ति आपल्यामध्यें बळावली. इंग्रजांच्या दृष्टीनें तें ठीक होतें. कारण आपल्याकडील २–४ जिल्ह्यांएवढे त्यांचे देश आहेत. त्यामुळें इतका प्रचंड देश असूं शकतो हें त्यांना कसें कळणार? इसापनीतींतील सशानें जेव्हां हत्ती पाहिला तेव्हां त्याला वाटलें कीं, हा एक प्राणी नसून अनेक ससे एका पोतडींत भरलेले आहेत. परंतु जेव्हां हत्तीच्या शेपटीवर आघात झाला तेव्हां त्यानें आपली सोंड मागें नेली व सोंडेवर आघात होतांच त्यानें शेपूट फटकारली. त्याप्रमाणें काश्मीरवर आघात होतांच कन्याकुमारीपर्यंत त्याची संवेदना पोंचून सारा देश खडबडून जागा झाला पाहिजे आणि दक्षिणेवर आघात होतांच काश्मीरला त्याचें दुःख जाणवलें पाहिजे. असें झालें तरच आपण एक राष्ट्र आहोंत या म्हणण्याला कांहीं अर्थ उरेल. सर्व देश माझा आहे व या देशाचे सर्व गुणावगुण माझे आहेत ही भावना निर्माण झाली पाहिजे. त्यासाठीं देशांतील सगळ्या भाषांचें कामचलाऊ ज्ञान आपण मिळविलें पाहिजे. इंग्रजीसाठीं आपण वीस-वीस वर्षें खर्चीं घालतों आणि







तरीहि चुकीचेंच इंग्रजी बोलतों. त्याऐवजीं तेवढयाच वेळांत देशांतील सर्व भाषा, मोडक्यातोडक्या का होईना, शिकण्याचा आपण प्रयत्न करूं तर आपण एक आहोंत ही भावना दृढ होण्यास मदत होईल. हल्लीं आपण म्हणतों : ' मीं तुझी भाषा कां शिकावी ? '. माझें याला उत्तर असें : ' तूं माझा भाऊ आहेस म्हणून माझें म्हणणें समजून घेण्यासाठीं तूं माझी भाषा शिकून घेतली पाहिजेस व मीं तुझी शिकून घेतली पाहिजे.' मला जर कोणीं विचारलें, ' तुझी मातृभाषा काय ? ' तर मी सांगेन, 'माझ्या मातृभाषा किंवा मावशी-भाषा बारा आहेत. किंबहुना माझी भाषा एकच आहे व ती म्हणजे भारतीय भाषा. भारतांतील इतर सर्व तिच्या बोलभाषा आहेत.' इतकी आत्मीयता निर्माण व्हावी अशी साने गुरुजींची तळमळ होती.

" हें कसें होणार ? त्यासाठीं साहित्यिकांनीं कंबरा कसल्या पाहिजेत आणि जनतेच्या भाषेंत लिहून तिच्या अंतःकरणापर्यंत हा संदेश पोंचविला पाहिजे. बाराव्या शतकांत कन्नड भाषेंत बसव हा श्रेष्ठ संतकवि होऊन गेला. तत्पूर्वी सर्वत्र संस्कृतचें राज्य होतें. त्यानें प्रथम कन्नड भाषेंत लिहून ' वचन ' नांवाच्या वाङ्मयप्रकारास जन्म दिला. आजहि बसवाचीं वचनें सबंध कर्नाटकांत घरोघरीं प्रचलित आहेत. सुमारें दहा वर्षांपूर्वी मी एका खेड्यांत गेलों असतां खताची गाडी हांकणारा एक मुलगा कनकदासाचें पुढील पद गात होता :

' नी मायेयोळगो निन्नलु मायेयो '

' तूं मायेमध्यें आहेस कीं तुझ्यामध्यें माया आहे ? ' याचा अर्थ असा कीं, ब्रह्म, माया वगैरे अत्यंत गूढ तत्त्वज्ञानहि जनतेच्या भाषेंत दिल्यामुळें तें सामान्य जनतेच्या हृदयापर्यंत जाऊन पोंचलें. हेंच कार्य आतां आपण करून लोकांमध्यें मानसिक व आध्यात्मिक ऐक्याची जाणीव नव्यानें निर्माण केली पाहिजे. आपल्या ज्ञानाचें भांडार सर्वसामान्य जनांपर्यंत जाऊन पोंचेल तेव्हांच आपल्या देशाची उन्नति होईल आणि तेव्हांच गांधीजींनीं इच्छिल्याप्रमाणें भंग्याची मुलगी हिंदुस्थानच्या राष्ट्रपतिपदावर आरूढ होऊं शकेल. "

## पंचवार्षिक योजना

नुकतीच आपल्या मध्यवर्ती लोकसभेनें पक्की ' पंचवार्षिक योजना ' मंजूर केली. ती लोकसभेपुढें सादर करतांना ( १५-१२-५२ ), पं. जवाहरलाल नेहरू यांनीं ' पंचवार्षिक योजने '-मागील तात्त्विक बैठकीचें दिग्दर्शन केलें. त्यांच्या त्या भाषणाचा सारांश पुढें दिला आहे :

" ही योजना करतांना आम्हीं हिंदुस्थानचा सर्व बाजूंनीं—शेती, उद्योगधंदे, सामाजिक व आर्थिक व्यवस्था या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन—साकल्यानें विचार केला आहे. आर्थिक समता स्थापन करणें, श्रीमंत-गरीब असा भेद नाहींसा करून, सर्वांना समान संधि देऊन, वर्गरहित समाजाची स्थापना करणें, हें आमचें उद्दिष्ट आहे.

" सरकारनें ' संयोजन ' ( Planning ) करण्याची कल्पना, सोव्हिएट युनिअननें आपली स्वतः-ची पहिली पंचवार्षिक योजना केल्यापासून, दृढ झाली. आम्ही देखील संयोजन करीत आहोंत. परंतु आमची संयोजनाची पद्धति निराळी आहे. लोकशाही घटना आम्हीं विचारपूर्वक स्वीकारली आहे. म्हणून साहजिकच आमचें ' संयोजन ' हें त्या लोकशाही घटनेशीं सुसंगत असेंच असलें पाहिजे. अर्थात्, लोकशाहीची पद्धति स्वीकारल्यामुळें आमच्या योजनेला कांहीं मर्यादा, कांहीं बंधनें पडतात, तीहि गुंतागुंतीचीहि होते. परंतु अशा लोकशाही पद्धतीनेंच जें कांहीं घडून येतें तें मजबूत पायावर उभारलें जातें. कारण लोकशाहीचा मूळ आधार म्हणजे राष्ट्रांतील व्यक्ति. ती मानवी व्यक्ति न विसरतां तिच्या अधिष्ठानावरच लोकशाही संयोजन आम्हांस करावयाचें आहे. आम्हीं जी लोकशाही राज्यघटना केली आहे, तिच्याशीं सुसंगत असें आम्हीं संयोजन करूं असें म्हटलें, त्याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं, राज्यघटनेचा प्रत्येक भाग न् भाग अगदीं ( sacrosanct ) ? दैवी, अपरिवर्तनीय आहे ! ही योजना पार पाडतांना आम्हांला जर असें दिसून आलें कीं, राज्यघटनेचा अमका भाग राष्ट्राच्या प्रगतीच्या आड येत आहे, तर तो आपण आपल्या सर्वांच्या पूर्ण विचारानें लोकशाही पद्धतीनें बदलूनहि घेऊं शकतों.








" ही योजना तयार करतांना आम्हांला अनेक गोष्टी लक्षांत घ्याव्या लागल्या आहेत. आमचा देश एवढा मोठा, आमची अर्थव्यवस्था अत्यंत मागसलेली, आमची विचारसरणी गतानुगतिक, कालचे क्रान्तिकारक आज प्रतिक्रान्तिकारक झालेले, या बरोबरच आपल्या देशांत सळसळत असलेली नवीन सामाजिक चैतन्यमय जाणीव—या सर्व गोष्टींचा आपणांस विचार करावा लागतो. म्हणून आपणांस कोणत्याहि आर्थिक, धार्मिक वा इतर ठोकळेबाज विचारसरणींचा अवलंब करून चालणार नाहीं. आज आपणांस आपल्या देशांतील प्रत्यक्ष परिस्थिति काय आहे ती लक्षांत घेऊनच योजना करावयाची आहे, दुसऱ्या कोणत्या देशांतील परिस्थिति गृहीत धरून नव्हे !

" असा जेव्हां मी सबंध भारताचा विचार करतों, त्या वेळेला पंचवार्षिक योजनेचे हे जाडे ग्रंथ मी घटकाभर विसरतों आणि माझ्यापुढें सबंध राष्ट्राचें भव्य चित्र उभें राहतें. राष्ट्राचें म्हणजे कोणा अमूर्त, निराकार वस्तूचें नव्हे, तर आपण ३६ कोट लोक परस्परसहकार्यानें आपल्या राष्ट्राची पुनर्रचना करीत आहोंत, असें भव्य चित्र माझ्यापुढें उभें राहतें.

" पाश्चात्त्य देशांत औद्योगिक क्रांतीनें प्रचंड प्रगति घडवून आणली आहे. त्याच औद्योगिक क्रांतीच्या दोन शाखांचे प्रतिनिधी म्हणजे अमेरिका व सोव्हिएट युनिअन होत. आज जरी त्यांच्यांत संघर्ष असला, तरी त्या एकाच झाडाच्या शाखा होत. आपणहि आपला वेग शक्य तितका वाढवून जगांतील औद्योगिक क्रान्तीचा वेग गांठला पाहिजे. पण तें करतांना औद्योगिक क्रांतीच्या इतिहासांत ज्या चुका झाल्या त्या आपण कां टाळूं नयेत ? आज आपण आपल्या राष्ट्रांत उद्योगधंदे वाढविण्याच्या दिशेनें कितीहि मोठीं पावलें टाकलीं, तरी पुढील दहा-वीस वर्षांत उद्योगधंद्यांतून कांहीं थोड्या लोकसंख्येलाच—दोन-तीन कोटि लोकांनाच—काम मिळूं शकेल. बाकीच्या कोट्यवधि जनतेला शेती, लहान उद्योग, ग्रामोद्योग ह्यांतूनच काम मिळेल. म्हणून मोठे उद्योगधंदे आणि ग्रामोद्योग यांच्यांत विरोध आहे असें मानूं नये. ते परस्परांना पूरकच आहेत. अर्थात् मोठे प्रचंड उद्योगधंदे वाढविल्याशिवाय आपलें जीवनमान उंचावणें व आपल्या देशाचें संरक्षण होणें कठीणच आहे. पण प्रचंड प्रमाणावर उद्योगधंदे वाढवितांना, या प्रश्नाची मानवी बाजूहि लक्षांत ठेविली पाहिजे. नुसती संपत्ति वाढून उपयोगी नाहीं. त्या संपत्तीचा उपभोग घेणारा जो माणूस तो अधिक चांगला माणूस व्हावा अशीहि दक्षता घेतली पाहिजे. इतर देशांवरून आपणांस दिसतें कीं, नुसती आर्थिक प्रगति म्हणजे कांहीं मानवी किंवा राष्ट्रीय प्रगति नव्हे.... "

## सारिपुत्त व मोग्गल्लान

भगवान् बुद्धाचे महान् शिष्य सारिपुत्त व मोग्गल्लान यांचे अवशेष नुकतेच (नोव्हेंबर २९–३० तारखेस) सांचीला परत आले असून, सांची येथील जुन्या स्तूपाजवळ बांधलेल्या एका नव्या विहारांत मोठ्या आदरभावनायुक्त समारंभानें ठेवले गेले. या समारंभाच्या निमित्तानें सांचीला आशियांतील बुद्धधर्मीयांचे प्रमुख प्रतिनिधी आले होते. त्यांची व बुद्धधर्माच्या चाहत्यांची मोठी बुद्धधर्म-परिषद्हि भरली होती. भगवान् बुद्धांना आपलें धर्मचक्रप्रवर्तन करण्याच्या बाबतींत ज्यांचें मोठें साहाय्य झालें त्यांत सारिपुत्त व मोग्गल्लान यांचें स्थान अग्रगण्य होय. या दोन महान् बुद्धशिष्यांसंबंधीं एक लेख श्री. पु. सं. लाड यांनीं 'साधने'त (२९।११।१९५२) लिहिला आहे. त्यावरून पुढील भाग उद्धृत केला आहे :

" तो काळ जगाच्या इतिहासांत मतिमंथनाचा होता. ग्रीसमध्यें काय, चीनमध्यें काय किंवा आर्यावर्तांत काय, विचारवंतांचें परंपरागत यज्ञयागादि कर्मकांडानें समाधान होत नव्हतें. म्हणून मूलभूत तत्त्वांची चिकित्सा सुरू झाली होती. मंदिरांत देवतांना अर्घ्यांपायनें देणारा सॉक्रेटिस बाजारांत वादविवाद करीत जीवनाचीं तत्त्वें शोधीत फिरत होता. राज्यकारभाराचा अनुभव घेऊन परंपरेच्या आचारधर्मांत पारंगत झालेला कान्फ्यूशिअस आचाराचा शीलाशीं समन्वय घालीत होता; तर भारतवर्षांत कर्म आणि नैष्कर्म्य, त्याग आणि भोग यांच्यामधील मध्यममार्ग भगवान् बुद्ध बहुजनांना












दाखवीत होते...अशा काळांत सारिपुत्त आणि मोग्गल्लान यांचा जन्म झाला. दोघेहि जातीचे आणि पद्वीचे ब्राह्मण होते...दोघेहि मगध देशांत जन्म पावले. सारिपुत्ताचें मूळचें नांव उपतिष्य होतें. त्याचा बाप धर्मपाली नांवाचा ब्राह्मण आणि आई शाली किंवा रुपशाली नांवाची ब्राह्मणी होती.... मगध देशांत राजगृहाजवळ असलेल्या कोलत किंवा कोलीत गांवांत घान्यायननामक महापंडित ब्राह्मण होता. मौद्गल्य, (जो पुढें मौद्गल्यायन किंवा मोग्गल्लान म्हणून नामांकित झाला) त्या ब्राह्मणाचा मुलगा. परंपरा असें सांगते कीं, दोघांचाहि जन्म एकाच दिवशीं झाला. हीं दोन कुटुंबें मोठी सुखवस्तु होती. या दोन कुटुंबांचा सात पिढ्यांचा संबंध होता....या दोघांची बालपणापासून मैत्री होती... वेदविद्या शिकून हे दोघे विद्वान् झाले. ऐन तारुण्याच्या वेळीं बुद्धाप्रमाणेंच त्यांनाहि असमाधान वाटूं लागलें. असमाधानाला सुरुवात कशी झाली याचा इतिहास मोठा चित्तवेधक आहे. राजगृह येथें टेकडीवर दरवर्षी जत्रा भरत असे. तिला 'गिरग्गसमज्जा' (गिर्यग्रसमज्या) म्हणत असत. हे दोघेहि तेथें जाऊन नाच-तमाशा पाहाण्यांत रमले असतां त्यांच्या मनांत एकाएकीं असा विचार आला कीं, शंभर वर्षांनंतर यांतील एकहि प्राणी शिल्लक राहावयाचा नाहीं. ते दोघेहि विचारांत मग्न झाले...तेथेंच त्या दोघांनीं संसार नश्वर जाणून परिव्राजक होण्याचा निश्चय केला. याप्रमाणें परिहासांतून परमार्थाकडे वळल्यानंतर ते दोघे प्रथम राजगृह येथें राहणाऱ्या संजय नांवाच्या प्रसिद्ध परिव्राजकाचे शिष्य झाले. परंतु त्यांच्या उपदेशानें त्यांना शांति मिळेना...बुद्ध भगवान् वेळू वनांत राहत असतां त्यांचा अस्सजि (अश्वजित्) नांवाचा शिष्य भिक्षाटनासाठीं राजगृहाला जात होता. त्याची आनंदी व प्रसन्न मुद्रा पाहून सारिपुत्ताची खात्री पटली कीं अर्हताचा मार्ग ज्याला सांपडला आहे असा हा भिक्षु असला पाहिजे...तो अस्सजीकडे गेला तेव्हां अस्सजीनें सारिपुत्ताला धर्मोपदेशाची खालील गाथा म्हणून दाखविली :

'ये धम्मा हेतुप्पभवा तेसं हेतुं तथागतो आह ।
तेसं च यो निरोधो एवंवादी महासमणो ॥'

'हेतूपासून--कारणापासून उत्पन्न झालेले जे गुण-धर्म--त्यांचे हेतु (किंवा कारणें) तथागतानें सांगितले आहेत आणि त्यांचा निरोध कसा होतो हेंहि सांगितलें आहे.' महाश्रमणाचा हा तत्त्ववाद आहे. ही गाथा फार प्रसिद्ध असून प्राचीन शिलालेखांत पुष्कळ ठिकाणीं सांपडते. बुद्धाचें सारें तत्त्वज्ञान या गाथेंत सामावलें आहे. ती ऐकतांच सारिपुत्ताचे धर्मचक्षू विमल झाले; आणि त्याला एकदम साक्षात्कार झाला कीं, ज्या गुणधर्मांचा, दुःखांचा समुदय होतो त्यांचा निरोधहि होऊं शकतो. दुःख-समुदय आणि दुःखनिरोध हीं आर्यसत्यें त्यानें जाणलीं. नंतर त्यानें ही माहिती मोग्गल्लानाला सांगितली...सारिपुत्त प्रज्ञा, शील आणि उपशम यांची मूर्ति समजला जात असे. बुद्धानें आरंभींच भाकित केल्याप्रमाणें हे दोघे अग्रश्रावक झाले. 'आपण सुरू केलेलें धर्मचक्र चालूं ठेवणारा सारिपुत्तासारखा दुसरा कोणी मला दिसत नाहीं' असें बुद्धानें उघड बोलून दाखविलें आहे...भिक्षु-संघाची सारिपुत्त इतकी काळजी वाहत असे कीं, ज्या विहारांत ते भिक्षू राहत असत त्या विहारांतून ते भिक्षेकरितां संचारार्थ निघाले म्हणजे सारा विहार सारिपुत्त झाडूनझुडून स्वच्छ करीत असे. सामान साफसूफ करून, भांडीं पाण्यानें भरून ठेवीत असे... निर्वाणसमयीं सारिपुत्ताची देहाविषयीं वृत्ति 'पडेल तेथें सुखे पडो' अशी झाली होती. त्याच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे :

'नाभिनन्दामि मरणं, नाभिनंदामि जीवितम्
कालंच पटिकङ्खामि निब्बिसं भतको यथा'
[ निब्बिस = वेतन, भतक--सेवक ]

असा तो कृतकृत्य झालेला जनसेवक होता... पुढें अवघ्या पंधरा दिवसांनीं मोग्गल्लानाचें निर्वाण झालें. असें दिसतें कीं ऋद्धिसिद्धि प्राप्त झालेल्या मोग्गल्लानाविषयीं कांहींच्या मनांत असूया होती. सारिपुत्त आणि मोग्गल्लान यांना विरोध करणारे लोक संघांतहि होते. त्यामुळे असो किंवा पूर्वकर्मविपाकाचें फळ म्हणून असो, मोग्गल्लानाचा मारेकऱ्याकडून खून झाला...आज पंचवीसशें वर्षांनंतर सारिपुत्ताचें दर्शन घेतांना त्यानें म्हटलेल्या एका गाथेची आठवण होते :







' बोधनेय्यं जनं दिस्वा, सतसहस्सेपि योजने
खणेन उपगन्तान बोधेति तं महामुनि '

बहुजनसमाज आजहि बोधाची वाट पाहात आहे. काळाची तीं शतसहस्र योजनें ओलांडून पात्रचीवर घेऊन चाललेली सारिपुत्ताची प्रशांत मूर्ति कोठें दिसेल काय ?...कदाचित् त्याचे आधुनिक अवतार असतीलहि व दिसतीलहि. ''

## सेंट फ्रान्सिस् झेविअर

गेल्या महिन्यांत मलबार आणि गोवें येथील रोमन कॅथॉलिक खिस्ती जनतेला यात्रेचा व जत्रेचा वाटण्यासारखा एक मोठा समारंभ ' जुन्या गोव्यां 'त साजरा झाला. संत फ्रान्सिस् झेविअर याचें ४०० वर्षांचें जुनें शव शवपेटिकेंतून काढून तपासण्यांत आलें आणि लोकांना दर्शन घडावें म्हणून कित्येक दिवस तें उघडें ठेवण्यांत आलें. या खिस्ती कॅथॉलिक संताचें नांव हिंदी जनतेला परिचित आहेच. रोमन कॅथॉलिक मिशन्र्सनीं अनेक शहरांतून चालविलेल्या ज्या शिक्षणसंस्था आहेत त्यांपैकीं कित्येक शाळा-कॉलेजें या संताच्या नांवाचीं आहेत.—या साधुपुरुषाच्या जीवनचरित्राची माहिती 'भारतज्योती'-मधील ( ७-१२-५२ ) श्री. नारायणराव कुलकर्णी यांच्या लेखांत आलेली आहे त्यांतील कांहीं भाग पुढें संकलित करून दिला आहे :

" संत फ्रान्सिस् उर्फ फ्रान्सिस्को द झेविअर याचा जन्म सन १५०६ मध्यें ७ एप्रिल रोजीं स्पेनमध्यें आपल्या आईच्या किल्ल्यांत ( कॅसल ऑफ झेविअर ) झाला. १५२४ मध्यें तो पॅरिस विद्यापीठाच्या सेंट बार्बरानामक कॉलेजांत गेला व अतिशय हुशार विद्यार्थी म्हणून नांव मिळाल्यावर त्याची कॉलेज ऑफ बोवे ( Beauvais ) या संस्थेंत ॲरिस्टॉटेलिअन् तत्त्वज्ञानाच्या अध्यापकाच्या जागीं नेमणूक झाली. १५३० मध्यें त्यानें ' मास्टर ' ( एम्. ए. )ची पदवी मिळविली.

" १५२९ मध्यें त्याचा मित्र लॉयोला याच्याशीं त्याचा सहवास घडल्यावर त्याचें लक्ष धर्माकडे वळलें व तो कॅथॉलिक मिशनरी ( धर्मप्रचारक ) बनला. १५३४ सालीं त्यानें लॉयोला वगैरे मित्रांसह जेसुइट नामक कॅथॉलिक पंथाची दीक्षा घेतली. १५३७ च्या जानेवारींत ते सर्व व्हेनिस शहरीं आले आणि तेथें त्यांनीं असाध्य रोगांनीं जर्जर अशा रोग्यांच्या रुग्णालयांत मानवसेवेचें काम करून आपलें मानवप्रेम व्यक्त केलें. त्यामुळें पोप तिसरा पॉल यानें त्या सेवेबद्दल त्यांचा सन्मान केला आणि फ्रान्सिसला ( १५३७ सालीं ) प्रीस्ट ( धर्मगुरु ) म्हणून जाहीर केलें.

" पोर्तुगालचा राजा तिसरा जॉन याला हिंदुस्थानांत एक धर्मप्रचारक मिशन पाठवावयाचें होतें. त्यासाठीं फ्रान्सिस् १५४० सालीं मस्कारेन्हास व रॉड्रिग्ज यांसह लिस्बनला गेला. तेथून १५४१ च्या एप्रिलमध्यें तो हिंदुस्थानला येण्यास निघाला आणि १५४२ च्या मेमध्यें गोव्याला आला. लगेच त्यानें समुद्रकिनाऱ्यावरील गरीब व मच्छीमार लोकांत आपलें मानवसेवेचें व धर्मप्रचाराचें काम मोठ्या जोमानें सुरू केलें व त्या लोकांचें जीवन सुधारण्याची त्यानें कोशीस चालविली. मग तो त्रावणकोरला गेला. तेथें त्यानें ४० हून जास्तच खिस्ती वसाहती स्थापल्या. आपलें संतत्वाचें व साक्षात्काराचें सामर्थ्य त्यानें येथेंच प्रकट केलें. पुढें तो सिलोनला गेला व तेथून मद्रासमधील मायलापूर शहरीं जाऊन ॲपॉसल सेंट थॉमस याच्या कबरीचें त्यानें दर्शन घेतलें. मलाक्काला जाऊन त्यानें खिस्ती धर्माचा प्रचार केला व तेथून अनेक बेटांतून फिरून तो मलायाला गेला. १५४९ च्या ऑगस्टमध्यें तो जपानला गेला आणि तेथें दोन वर्षें राहिला. तेथून चीनला जावयाचा संकल्प करून त्यासाठीं तो गोव्याला पोर्तुगीज व्हाइसरॉयला भेटायला परतला. त्यानें चीनला पोर्तुगीज वकील म्हणून परेरा याला पाठवायला व्हाइसरॉयची संमति मिळविली व त्याच्याबरोबर कॅन्टनला जाण्यासाठीं जहाजांत बसला. पण प्रवासांतच तापानें पछाडला जाऊन तो ता. २ डिसेंबर १५५२ रोजीं मरण पावला. त्याचें मृत शरीर शवपेटिकेंत ठेवून त्यांत कांहीं रसायनें ( quicklime ) घालण्यांत आलीं व तें चार महिन्यांनीं मलाक्कांत पुरण्यांत आलें. पुढें ती शवपेटिका गोव्याला आली. १६२१ सालीं पंधराव्या ग्रेगरीनें फ्रान्सिसला संतपद दिलें. त्याच्या नांवावर अनेक चमत्कार प्रचलित आहेत. या

चमत्कारांचा ग्रंथ प्रत्यक्ष पाहिलेल्या साक्षीदारांच्या पुराव्यानें तयार करुन तो व्हॅटिकन्‌मध्यें ठेवण्यांत आला आहे.

" त्याला कधींहि माहीत नसलेल्या कित्येक भाषा तो सहज बोले. हा एक चमत्कारच होता. वेगवेगळ्या ३० भाषांतून तो सहज बोले व प्रचार करी. त्रावणकोरला तो गेला तेव्हां हा चमत्कार प्रथम दिसला. तेथें त्यानें पारवा ( Parwas ) लोकांत कार्य सुरु केलें. एकदम तो मलबारी बोलींतून प्रचार करुं लागला ! आंबोयना येथें जाण्यासाठीं एका जहाजावर तो चढला. जहाजाचे खलाशी वेगवेगळ्या प्रांतांतील हिंदी लोक होते. पण त्या सर्वांशीं त्यानें प्रत्येकाच्या वेगळ्या बोलींत गप्पागोष्टी सुरु केल्या. गूढ सामर्थ्यामुळें या संताच्या शब्दांतील रहस्य लोकांना समजलें.

" संत फ्रान्सिसूच्या मृत्यूनंतरहि त्याचें मुख प्रेक्षकांना आनंदी व टवटवीत असलेलें आढळलें होतें. मृत्यूनंतर तीन महिन्यांनीं कबरींतून त्याची शवपेटिका मलाक्काला आणण्यासाठीं काढली व उघडून पाहिली तेव्हांहि त्याचें मृत शरीर टवटवीत आणि रक्तपूर्ण आढळलें ! शरीरांतुन मधुर सुगंध दरवळत असल्याचें सर्वांच्या प्रत्ययास आलें. शेवटीं तें शव बॉम्‌ जीझस्‌ नामक जुन्या खिस्त-मंदिरांत ठेवण्यांत आलें.

" संत फ्रान्सिसूच्या मृत्यूनंतर चार वर्षांनीं गोव्याच्या व्हाइसरॉयचा मुख्य डॉक्टर व मुख्य धर्मगुरु यांनीं शव तपासलें व असें नमूद करुन ठेवलें कीं, शरीर सडलेलें नाहीं, आंतडीं जशींच्या तशीं आहेत आणि हृदयाजवळ एक व्रण पडला असून त्यांतून रक्त वाहत आहे ! १८५९ मध्यें शवाची तपासणी केली तेव्हां पूर्वीचें सर्व तसेंच होतें, फक्त कातडें तेवढें विरुं लागलें होतें... "

## अणुशक्तीचा विधायक उपयोग

पुढील माहिती ' सायन्स ॲन्ड कल्चर ' या मासिकावरुन संकलित केली आहे.

प्रो. लॉइड इ. ब्राउनवेल या मिचिगन विद्यापीठांतील प्राध्यापकांनीं असें नमूद केलें आहे कीं, दूध आणि मांसाचा विशिष्ट प्रमाणांतील भाग अणुजन्य रॅडिएशनखालीं ठेवून मग प्लास्टिकच्या पिशव्यांत भरुन ठेवला. खोलीच्या उष्णतामानाएवढेंच त्या वस्तूंचें उष्णतामान होतें. तीन आठवड्यांनंतरहि ते दोन्ही पदार्थ खराब झालेले आढळले नाहींत. कांहीं फळें, भाज्या व फळांचा रस यांवरहि हा प्रयोग करण्यांत आला. पण त्यांत एवढें यश आलें नाहीं. अणुजन्य रॅडिएशनमुळें स्वाद किंवा पौष्टिक गुण यांवर किती परिणाम होतो तें अजून नक्की व्हावयाचें आहे. एवढेंच दुधाचे नमुने रॅडिएशनखालीं न ठेवतां तसेच खोलीच्या उष्णतामानांत प्लास्टिक पिशव्यांत ठेवले असतां २४ तासांत आंबल्याचें आढळलें आणि ४८ तासांनंतर तर दही घट्ट होऊन पाण्यापासून विलगहि झालें. पण अणुजन्य किरणांतून काढलेले नमुने मात्र तीन आठवडे राहिले, केवळ रंग मात्र अधिक सायट ( creamier ) दिसूं लागला इतकेंच.

हार्वेल येथील अणुसंशोधनसंस्थेनें अणुजन्य शक्तीनें चालणारें मध्यवर्ती उष्णताजनक यंत्र उभारलें असून त्याच्या योगें इमारतींत उष्णता खेळवणें आणि घरगुती वापरासाठीं ऊन पाणी पुरवणें या गोष्टी केल्या जात आहेत. त्यामुळें दर वर्षाला १००० टन कोळशाची बचत होईल असा अंदाज आहे. एकंदर खर्च वजा जातां, दरवर्षी २६५० पौंडांची बचत व्हावी असा अंदाज आहे. हें यंत्र उभारण्यासाठीं १५००० पौंड खर्च आला आहे. इमारतींत खेळवलेलें उष्णतावर्धक पाणी किंवा घरगुती उपयोगाचें पाणी वापरण्यांत, रेडिओॲक्टिव्हिटीपासून त्रास होण्याचें मुळींच भय राहाणार नाहीं अशीच योजना करण्यांत आली आहे.

१९५१ सालीं अमेरिकेंत अणुशक्तीचा विधायक कार्याकडे उपयोग करण्याचे प्रयोगहि बरेच झाले. त्यामुळें सर्व जगाचा फारच फायदा होईल अशी अपेक्षा आहे. अमेरिकेंतील इडाहो ( Idaho ) संस्थानांतील प्रयोग तर सर्वांत महत्त्वाचा ठरावा. तेथें अणुशक्तीच्या साह्यानें १०० किलोवॅट वीज उत्पन्न करण्यांत येऊन तिचा उपयोग पंप व इतर विद्युत्‌-साधनें व इमारतींतील विद्युत्प्रकाश यांकडे करण्यांत आला. अणुगर्भांतील स्फोटक शक्तीचा उपयोग वीज निर्माण करण्याकडे केल्याचें हें पहिलेंच उदाहरण







होय. अर्थात् हा उपयोग किफायतशीर होणें हें पुढील प्रयोगांवर अवलंबून आहे. अमेरिकेंतील प्रमुख साधनोत्पादक कंपन्यांचा असा कयास आहे कीं, येत्या २० वर्षांत किंवा त्याहून अगोदरच अणुजन्य शक्ति ही देशांतील यंत्रचालक शक्तीच्या वाढत्या गरजेला पुरेशी होणारी ठरावी. याशिवाय जगांतील अप्रगत भूप्रदेशांत तर या शक्तीनें चमत्कार करून दाखवितां येतील.

## 'सिफिलिस्' रोगाचा विचित्र इतिहास

'उपदंश' अथवा 'गरमी' नांवाचा रोग प्राचीन जगांत नवीनच आला. आपल्याकडे त्याला 'फिरंगी' रोग असें नांव मिळालें. तें वास्को ड गामाच्या अनुयायी लोकांनीं त्याचें बीज येथें आणल्यावर मिळालें. अत्यंत गलिच्छ व आनुवंशिक रोग म्हणून लोकांना याचा फार तिटकारा वाटतो. सुदैवानें आज तो असाध्य रोग राहिला नाहीं. पेनिसिलिन् व इतर नवीन औषधें अस्तित्वांत आल्यामुळें या रोगाला बराचसा ताब्यांत ठेवतां आलें आहे. हा रोग संसर्गजन्य असून रोगी स्त्री-पुरुषांचा लैंगिक संबंध हें याचें मुख्य वाहन आहे. यासंबंधीं एक लेख 'रीडर्स डिजेस्ट' (सप्टेंबर १९५२) च्या अंकांतून आला आहे. त्यावरून पुढील माहिती संकलित केली आहे :

हा रोग प्रथम कोठें होता हा विवाद्य विषय आहे. पण तो कोलंबसाच्या सफरींतील लोकांनीं वेस्ट इंडीजमधून युरोपांत आणला हें निश्चित. अॅन्टील बेटांत हा रोग त्या वेळीं इतका पसरलेला होता कीं, कोलंबसाच्या लोकांचा तेथल्या वन्य इन्डिअन स्त्रियांशीं संबंध येतांच त्या सर्वांना तो जडला आणि त्यांनीं तो स्पेनमध्यें आणला. १४९३ मध्यें सेव्हाइल, बार्सीलोना वगैरे शहरांत तो सांथीच्या स्वरूपांत भडकला. १४९५ मध्यें फ्रान्सच्या ८ व्या चार्ल्सनें नेपल्सवर चढाई केली व बरोबर जर्मन, स्विस, स्लाव्ह, हंगेरिअन, फ्रेंच लोकांचें लष्कर घेतलें. तिकडून स्पेननें नेपल्सच्या मदतीला स्पॅनिश लोक धाडले. याचा परिणाम असा झाला कीं, या लोकांच्या संसर्गानें हा रोग चार्ल्सच्या सैन्यांत पसरून युरोपच्या सर्व देशांत गेला. १४९८ सालीं वास्को ड गामानें तो हिंदुस्थानांत आणला व पुढें तो चीन-जपानमध्यें पसरला.

अनेक वर्षें या रोगाला नांवच नव्हतें किंवा अनेक नांवें होतीं असें म्हटलें पाहिजे. इटालिअन याला 'फ्रेंच' रोग मानीत, उलट फ्रेंच याला 'इटालिअन' रोग मानीत, कांहीं वेस्ट इन्डियन याला 'गोवर' मानीत, तर कांहीं याला तुर्की 'देवी' मानीत. सन १५३० मध्यें गिरोलामो फ्रास्कास्टोरो या वैद्यानें एक प्रदीर्घ कविता लिहिली. त्यांत सूकरप्रेमी डुक्करपाळ देव (Syphilus) याला देवाधिदेव अपोलोनें एका नव्या रोगाची शिक्षा दिलेली आहे; कारण त्यानें सूर्यदेवाचा कांहीं तरी अपमान केला होता. त्यावरून त्या रोगाला Syphilis हें नांव मिळालें व तेंच रूढ झालें. त्या वेळचे कांहीं वैद्य यावर पाऱ्याचा इलाज करून रोग्याला भयंकर उष्णतेच्या पेटींत ठेवीत. बहुतेक रोगी पाऱ्याच्या विषानें किंवा भयंकर उष्णतेनें मरून जात. बाहेरचीं भगंदरें पाऱ्यामुळें नीट झालीं तरी रोग्यांमध्यें वेड, अर्धांग-वायु, अंधत्व वगैरे विकारांचा प्रादुर्भाव या रोगा-मुळें वाढत्या वयामध्यें होई.

या रोगानें खालच्या वर्गाप्रमाणेंच उच्च वर्गालाहि पछाडलें होतें. रोममधील सामर्थ्यशाली बॉर्जिया राजांच्या कुटुंबांतील १७ माणसें या रोगानें पछाडलेलीं होतीं ! इंग्लंडच्या ८ व्या हेन्रीला हा रोग जडला होता व बहुधा म्हणूनच त्याच्या अनेक राण्यांना जन्मतः मृत मुलें झालीं. त्या रोगामुळें रशियाच्या भीषण 'इव्हान दि टेरिबल' बादशहाला वेड लागायची वेळ आली आणि फ्रान्सचा १ ल्या फ्रान्सिस् त्यानेंच आजारी पडला.

---

"अनियंत्रित राजे आणि झोटिंगशहा यांच्याविरुद्ध लोकशाहीनें बंड उभारलें खरें. परंतु लोकशाहीं-तूनच एक नवीन प्रकारची झोटिंगशाही निर्माण होण्याचा संभव आहे. सत्तालोलुपतेमुळें व्यक्तीप्रमाणेंच लोकशाहीहि भ्रष्ट होण्याची शक्यता आहे." —लॉर्ड अॅक्टन